दादा भगवान प्ररूपित

# कर्माचा सिद्धांत

मूल गुजराती संकलन : डॉ. नीरूबहन अमीन

मराठी अनुवाद : महात्मागण

**प्रकाशक** : अजीत सी. पटेल
दादा भगवान विज्ञान फाउंडेशन
1, वरूण अपार्टमेंट, 37, श्रीमाळी सोसायटी,
नवरंगपुरा पुलिस स्टेशनच्या समोर,
नवरंगपुरा, अहमदाबाद - 380009,
Gujarat, India.
**फोन :** +91 79 3500 2100



**प्रथम आवृत्ति** : 500 डिसेंबर, 2021

**भाव मूल्य** : 'परम विनय' आणि
'मी काहीच जाणत नाही', हा भाव!

**द्रव्य मूल्य** : 20 रुपए

**मुद्रक** : अंबा मल्टीप्रिंट
B-99, इलेक्ट्रॉनिक्स GIDC,
क-6 रोड, सेक्टर-25,
गांधीनगर-382044.
Gujarat, India.
**फोन :** +91 79 3500 2142

**ISBN/eISBN : 978-93-91375-09-6**

**Printed in India**

# त्रिमंत्र





नमो अरिहंताणं

नमो सिद्धाणं

नमो आयरियाणं

नमो उवज्झायाणं

नमो लोए सव्वसाहूणं

एसो पंच नमुक्कारो

सव्व पावप्पणासणो

मंगलाणं च सव्वेसिं

पढमं हवइ मंगलं ॥ १ ॥

ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥ २ ॥

ॐ नमः शिवाय ॥ ३ ॥

जय सच्चिदानंद





## दादा भगवान कोण?

जून १९५८ संध्याकाळची अंदाजे सहाची वेळ, सुरत स्टेशनवर अलोट गर्दी होती. रेल्वेच्या प्लेटफॉर्म नंबर तीनच्या बाकावर बसलेल्या श्री अंबालाल मूळजीभाई पटेल रूपी देहमंदिरात नैसर्गिक स्वरूपात कित्येक जन्मांपासून व्यक्त होण्यासाठी आतूर असलेले 'दादा भगवान' संपूर्णपणे प्रकट झाले आणि निसर्गाने सर्जन केले अध्यात्माचे अद्‌भुत आश्चर्य! एका तासात त्यांना विश्वदर्शन लाभले! मी कोण? भगवंत कोण? जग कोण चालवित आहे? कर्म म्हणजे काय? मुक्ती कशाला म्हणतात? इत्यादी जगातील सर्व आध्यात्मिक प्रश्नांची रहस्ये संपूर्णपणे प्रकट झाली.

त्यांना प्राप्ती झाली तशी ते फक्त दोन तासात इतर मुमुक्षूनां सुद्धा आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत, त्यांच्या सिद्ध झालेल्या अद्‌भुत ज्ञान प्रयोगाद्वारे! त्याला अक्रम (क्रमविरहीत) मार्ग म्हटले जाते. क्रम म्हणजे पायरी पायरीने, क्रमाक्रमाने वर चढणे! अक्रम म्हणजे लिफ्ट मार्ग! शॉर्ट कट!

ते स्वत: प्रत्येकाला 'दादा भगवान कोण?' याबद्दलची फोड करून देताना म्हणायचे की, "हे दिसतात ते 'दादा भगवान' नाहीत. हे तर 'ए.एम. पटेल' आहेत. आम्ही ज्ञानी पुरुष आहोत आणि आत प्रकट झाले ते दादा भगवान आहेत. दादा भगवान तर 'चौदालोकाचे' नाथ आहेत, ते तुमच्यात पण आहेत, सर्वांमध्ये आहेत! तुमच्यात अव्यक्त रुपात आहेत आणि 'येथे' माझ्या आत संपूर्णपणे व्यक्त झालेले आहेत! मी स्वत: भगवान नाही. माझ्या आत प्रकट झालेले 'दादा भगवान' यांना मी पण नमस्कार करतो."

## आत्मज्ञान प्राप्तीची प्रत्यक्ष लींक

परम पूज्य दादा भगवान (दादाश्री) यांना 1958 मध्ये आत्मज्ञान प्रकट झाले. त्यानंतर 1962 ते 1988 पर्यंत देश-विदेश परिभ्रमण करून मुमुक्षुंना सत्संग आणि आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत.

दादाश्रींनी आपल्या हयातीतच आत्मज्ञानी पूज्य डॉ. नीरूबहन अमीन (नीरूमा) यांना आत्मज्ञान प्राप्त करवून देण्याची ज्ञानसिद्धी प्रदान केली होती. दादाश्रींच्या देहविलयानंतर नीरूमा त्यांच्याप्रमाणेच मुमुक्षुंना सत्संग व आत्मज्ञान प्राप्ती निमित्त भावाने करवित असत.

आत्मज्ञानी पूज्य दीपकभाई देसाई यांना सुद्धा दादाश्रींनी सत्संग करण्याची सिद्धी प्रदान केली होती. वर्तमानात पूज्य नीरूमांच्या आशीर्वादाने पूज्य दीपकभाई देश-विदेशात निमित्तभावाने आत्मज्ञान प्राप्ती करवित आहेत.

या आत्मज्ञान प्राप्तीनंतर हजारो मुमुक्षु संसारात राहून, सर्व जबाबदाऱ्या सांभाळत असताना सुद्धा आतून मुक्त राहून आत्मरमणतेचा अनुभव घेत आहेत.

# निवेदन

ज्ञानी पुरुष दादा भगवान यांच्या श्रीमुखातून अध्यात्म आणि व्यवहार ज्ञानासबंधित जी वाणी निघाली, तिला रेकॉर्ड करून संकलन व संपादन करून पुस्तकाच्या रूपाने प्रकाशित केली जात आहे.

परम पूज्य दादाश्री हिन्दी फार कमी बोलायचे, कधी हिन्दी भाषी लोक यायचे की ज्यांना गुजराती भाषा समजत नसे त्यांच्यासाठी परम पूज्य दादाश्री हिन्दीत बोलायचे आणि ती वाणी कॅसेटस्‌मधून जशीच्या तशी ट्रान्स्क्राईब करून (हिन्दी) आप्तवाणी ग्रंथ तयार करण्यात आला आहे. नंतर त्या आप्तवाणी ग्रंथाला वाचकांच्या सुविधेसाठी पुन्हा संकलित करून सहा छोटी पुस्तके तयार करण्यात आली आहेत.

1) ज्ञानी पुरुषाची ओळख
2) जगत कर्ता कोण?
3) कर्माचा सिद्धांत
4) अंत:करणाचे स्वरूप
5) सर्व दु:खांपासून मुक्ती
6) आत्मबोध

प्रस्तुत पुस्तकात त्याच मूळ (हिन्दी) ग्रंथाला मराठी भाषेत यथार्थ रूपाने अनुवादित करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु दादाश्रींच्या आत्मज्ञानाचा आशय जसा आहे तसा तर आपल्याला गुजराती भाषेतच अवगत होईल. ज्यांना ज्ञानाचा गहन अर्थ समजून घ्यायचा असेल, ज्ञानाचे खरे मर्म समजायचे असेल त्यांनी ह्या हेतूने गुजराती भाषा शिकावी असा आमचा अनुरोध आहे.

प्रस्तुत पुस्तकात काही ठिकाणी कंसात दर्शविलेले शब्द किंवा वाक्य दादाश्रींद्वारा बोलल्या गेलेल्या वाक्यांना अधिक स्पष्टतापूर्वक समजावण्यासाठी लिहिले गेले आहेत. तसेच काही ठिकाणी इंग्रजी शब्दांना मराठी अर्थाच्या रूपात ठेवले गेले आहेत.

अनुवादासंबंधी उणीवांबद्दल आपले क्षमा प्रार्थी आहोत.

**- डॉ. नीरूबहन अमीन**

# दादा भगवान फाउन्डेशनची प्रकाशित मराठी पुस्तकें

1. भोगतो त्याची चूक
2. एडजस्ट एवरीव्हेर
3. जे घडले तोच न्याय
4. संघर्ष टाळा
5. मी कोण आहे ?
6. क्रोध
7. चिंता
8. प्रतिक्रमण (सं)
9. भावना सुधारे जन्मोजन्म
10. कर्माचे विज्ञान
11. पाप-पुण्य
12. आई-वडील आणि मुलांचा व्यवहार (सं)
13. पति-पत्नीचा दिव्य व्यवहार (सं)
14. समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य (सं)
15. मानव धर्म
16. मृत्युवेळी, आधी आणि नंतर
17. सेवा-परोपकार
18. दान
19. त्रिमंत्र
20. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
21. चमत्कार
22. सत्य-असत्याचे रहस्य
23. वाणी, व्यवहारात (सं)
24. पैशांचा व्यवहार (सं)
25. क्लेश रहित जीवन
26. निजदोष दर्शनाने... निर्दोष!
27. प्रेम
28. गुरू-शिष्य
29. अहिंसा
30. आप्तवाणी-1, 2
31. जगत कर्ता कोण ?
32. कर्माचा सिद्धांत

## हिन्दी

1. आत्मसाक्षात्कार
2. ज्ञानी पुरुष की पहचान
3. सर्व दु:खों से मुक्ति
4. कर्म का सिद्धांत
5. आत्मबोध
6. मैं कौन हूँ ?
7. पाप-पुण्य
8. भुगते उसी की भूल
9. एडजस्ट एवरीव्हेयर
10. टकराव टालिए
11. हुआ सो न्याय
12. चिंता
13. क्रोध
14. प्रतिक्रमण (सं, ग्रं)
16. दादा भगवान कौन ?
17. पैसों का व्यवहार (सं, ग्रं)
19. अंत:करण का स्वरूप
20. जगत कर्ता कौन ?
21. त्रिमंत्र
22. भावना से सुधरे जन्मोंजन्म
23. चमत्कार
24. प्रेम
25. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य (सं, पू, उ)
28. दान
29. मानव धर्म
30. सेवा-परोपकार
31. मृत्यु समय, पहले और पश्चात्
32. निजदोष दर्शन से... निर्दोष
33. पति-पत्नी का दिव्य व्यवहार (सं)
34. क्लेश रहित जीवन
35. गुरु-शिष्य
36. अहिंसा
37. सत्य-असत्य के रहस्य
38. वर्तमान तीर्थकर श्री सीमंधर स्वामी
39. माता-पिता और बच्चों का व्यवहार (सं)
40. वाणी, व्यवहार में... (सं)
41. कर्म का विज्ञान
42. सहजता
43. आप्तवाणी - 1 से 9
52. आप्तवाणी - 13 (पूर्वार्ध व उत्तरार्ध)
54. आप्तवाणी - 14 (भाग-1, 2)
56. ज्ञानी पुरुष (भाग-1)

**( सं - संक्षिप्त, ग्रं - ग्रंथ, पू - पूर्वार्ध, उ - उत्तरार्ध )**

**★ दादा भगवान फाउन्डेशन द्वारे गुजराती आणि इंग्रजी भाषेत सुद्धा बरीच पुस्तके प्रकाशित झाली आहे। वेबसाइट www.dadabhagwan.org वर सुद्धा आपण ही सगळी पुस्तके प्राप्त करू शकता।**

**★ प्रत्येक महिन्यात हिन्दी, गुजराती आणि अंग्रेजी भाषेत दादावाणी मेगेझीन प्रकाशित करीत आहे।**

# संपादकीय

जीवनात अशा अनेक घटना घडतात की तेव्हा आपल्या मनाला वाटते अरे! असे का घडले? भूकंपात कितीतरी लोक मारले गेलेत, बद्री-केदारनाथची यात्रा करणारे बर्फात दबले गेलेत, निर्दोष बाळ जन्मतःच अपंग झाले, कोणी ॲक्सिडेन्टमध्ये मृत्यू पावला... तर असे सर्व घडण्याचे कारण काय? शेवटी हे कर्माचे फळ आहे, असे समजून आपण समाधान करून घेतो. पण कर्म म्हणजे काय? कर्माचे फळ का भोगावे लागते? याचे रहस्य समजत नाही.

लोक कर्म कशाला म्हणतात? दिवसभर जे काही नोकरी-धंदा, सत्कार्य, धर्म, पूजा-पाठ वगैरे करतो, त्यालाच लोक कर्म म्हणतात. परंतु ज्ञानींच्या दृष्टीने हे कर्म नाही, तर हे कर्मफळ आहे. ज्यांचा पाच इंद्रियांनी अनुभव केला जातो, ती सर्व कर्मफळे आहेत, आणि कर्माचे 'बीज' तर खूप सूक्ष्म आहे. अज्ञानतेमुळे 'मी केले', असे म्हणतो, या कर्ताभावामुळे कर्मे चार्ज होतात.

एखादी व्यक्ती क्रोध करते पण मनात पश्चाताप करते, आणि दुसरी व्यक्ती क्रोध करून मनात खुश होते की 'मी क्रोध केला तो योग्यच आहे, तरच हा सुधारेल.' ज्ञानींच्या दृष्टीने क्रोध करणे हे पूर्व कर्मांचे फळ आहे, परंतु आज मात्र पुन्हा नवीन कर्मबीज पेरत आहे, मनात खुश होत आहे तर तो खराब बी पेरत आहे आणि पश्चाताप करत असेल तर तो नवीन चांगले बी पेरत आहे. आणि जो क्रोध करतो, ते सूक्ष्म कर्म आहे, त्याचे फळस्वरूप त्यालाही कोणी तरी मारेल. म्हणजे त्या कर्मफळाचा परिणाम त्याला इथेच मिळून जातो. आज जो क्रोध झाला, ते पूर्व कर्माचे फळ आले आहे.

कर्मांचे 'चार्जिंग' कसे होते? तर कर्ताभावाने कर्मे 'चार्ज' होतात. कर्ताभाव कशाला म्हणतात? करत असतो दुसरा कोणी तरी 'मी केले' असे मानतो तोच कर्ताभाव आहे.

कर्ताभाव कशामुळे होतो? अहंकाराने. अहंकार कशाला म्हणतात?

तर जो 'स्वत:' नाही, तरीदेखील तिथे 'मी आहे' असे मानतो, 'स्वत:' करत नाही तरीदेखील 'मी केले' असे मानतो, तोच अहंकार आहे. 'स्वत:' देह स्वरूप नाही, वाणी स्वरूप नाही, मन स्वरूप नाही, नाव स्वरूप नाही, तरीदेखील (हे सर्व) 'मीच आहे' असे तो स्वत: मानतो, तोच अहंकार आहे. म्हणजे अज्ञानतेमुळे अहंकार उत्पन्न झाला आहे. आणि त्यामुळे सतत कर्मबंधन होणे चालू आहे.

ज्ञानी पुरुष भेटले तर ते अज्ञानता 'फ्रॅक्चर' करून टाकतात, 'स्वत: कोण आहे' याचे ज्ञान देतात आणि हे 'सर्व कोण करत आहे', याचेही ज्ञान देतात. त्यानंतर अहंकार निघून जातो. नवीन कर्मे चार्ज होणे बंद होते. मग डिस्चार्ज कर्मेच बाकी राहतात. त्यांचा समभावाने निकाल केल्यानंतर मुक्ती होते.

परम पूज्य दादाश्रींकडून दोनच तासात ज्ञानप्राप्ती होत असे.

जीव पूर्वजन्मात कर्माचे 'बी' टाकतो. आणि आज या जन्मात त्या कर्माची फळे भोगावी लागतात. तर इथे कर्माची फळे देणारा कोण? ते रहस्य दादाश्रींनी समजावले की, 'ओन्ली सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्सेस्' (वैज्ञानिक संयोगी पुरावे) द्वारा हे फळ येते पण अज्ञानतेमुळे फळ भोगतेवेळी राग-द्वेष करतो, 'मी केले' असे मानतो, ज्यामुळे नवीन कर्मे चार्ज होतात. जेव्हा ज्ञानी पुरुष नवे कर्म चार्ज होणार नाही असे विज्ञान देतात तेव्हा मागील जन्माची फळे पूर्ण होत जातात, नवीन कर्म चार्ज होत नाही, आणि मग मुक्ती मिळते.

या पुस्तिकेत, परम पूज्य दादा भगवान यांनी आपल्या ज्ञानात अवलोकन करून जगाला जो कर्माचा सिद्धांत दिला तो प्रस्तुत केला आहे. आणि तो दादाश्रींच्या वाणीत संकलित झाला आहे. तो खूप संक्षिप्त आहे, तरीही वाचकांना कर्माचा सिद्धांत समजेल आणि जीवनाच्या प्रत्येक प्रसंगी समाधान प्राप्त होईल.

– **डॉ नीरूबहन अमीन यांचे**

**जय सच्चिदानंद**

# कर्माचा सिद्धांत

## जबाबदार कोण?

**प्रश्नकर्ता :** जर दुसरी शक्ती आमच्याकडून हे सर्व करवून घेत असेल तर मी जे वाईट कर्म करतो, त्या कर्माचे बंधन मला का होते? माझ्याकडून तर ते करवून घेतले होते?

**दादाश्री :** कारण तुम्ही त्याची जबाबदारी स्वीकारत असता की हे 'मी केले,' आणि आम्ही ती जबाबदारी घेत नाही, त्यामुळे आमच्यावर गुन्हा लागत नाही. तुम्ही तर कर्ता आहात. 'मी हे केले, ते केले', जेवलो, पाणी प्यायलो, ह्या सर्वांचा मी कर्ता आहे, असे तुम्ही बोलता ना? यामुळेच कर्म बंधन होत असते. कर्त्याच्या आधाराने कर्मबंधन होते. कर्ता स्वत: नसतो. तो फक्त इगोइजम (अहंकार) करतो, की 'मी केले.' हे जग असेच चालत असते. 'आम्ही हे केले, आम्ही मुलाचे लग्न लावले.' असे बोलायला हरकत नाही. बोलावे तर लागते, पण तो अहंकार करतो.

'तुम्ही चंदुभाऊ आहात', ही गोष्ट खोटी नाही. ही खरी गोष्ट आहे. परंतु रिलेटिव्ह सत्य आहे, रियल नाही. आणि तुम्ही रियल आहात. रिलेटिव्ह सापेक्ष आहे आणि रियल निरपेक्ष आहे. तुम्ही 'स्वत:' निरपेक्ष आहात आणि म्हणता 'मी चंदुभाऊ आहे.' त्यामुळे मग तुम्ही सापेक्ष झालात. ऑल दिज रिलेटिव्ह आर टेम्परररी एडजस्टमेंटस् (ही सर्व सापेक्ष तात्पुरती समायोजने आहेत.) कोणी चोरी करतो, कोणी दान देतो, हे सर्व देखील परसत्ता करवून घेत असते. आणि तो स्वत: असे मानतो की 'मी केले' म्हणून त्याच्यावर गुन्हा लागू होतो. आयुष्यभर तुम्ही जे काही करता त्याला जबाबदार कोणीच नाही. जन्मापासून

'शेवटच्या स्टेशन'पर्यंत जे काही केले, त्याची जबाबदारी तुमची नसतेच. परंतु तुम्ही स्वतः ती जबाबदारी घेता, की 'हे मी केले, हे मी केले, मी वाईट केले, मी चांगले केले.' अशी स्वतःच जबाबदारी घेत राहता.

**प्रश्नकर्ता :** कोणी श्रीमंत असतो, कोणी गरीब असतो, कोणी अशिक्षित असतो, तर असे असण्याचे कारण काय?

**दादाश्री :** नोबडी इज रिस्पोन्सिबल (कोणीच जबाबदार नाही).

कर्मासाठी तो किती जबाबदार आहे? तर 'मी केले' असे बोलतो, एवढाच जबाबदार आहे, 'मी केले' असा अहंकार करतो एवढाच जबाबदार आहे. ही जी जनावरे आहेत ती जबाबदार नाहीत. कारण ती अहंकार करतच नाहीत.

हा जो वाघ आहे, तो कितीतरी जनावरांना मारून टाकतो, त्यांना खातो. परंतु त्यासाठी तो अजिबात जबाबदार नाही, नो रिस्पोन्सिबिलिटी. आणि हा मनुष्य तर 'मी हे केले, मी ते केले' असे म्हणतो, 'मी वाईट केले, मी चांगले केले' असा अहंकार करतो. आणि सगळी जबाबदारी स्वतःच्या डोक्यावर घेतो. मांजर एवढे सारे उंदीर खाते, तरी तिला त्याची जोखीमदारी नाही. नोबडी इज रिस्पोन्सिबल एक्सेप्ट मेनकाइंड (मानवजातीशिवाय कोणीच जबाबदार नाही) देवलोक पण जबाबदार नाहीत.

इथे तुम्हाला संपूर्ण सत्य जाणायला मिळेल. गिलेट केलेले (नकली) सत्य नाही. संपूर्ण सत्य आहे. आम्ही 'जसे आहे तसेच' बोलतो.

जग असेच चालत असते. तो अहंकार करतो म्हणून कर्म बांधत असतो.

## कर्मबंधन कर्तव्याने की कर्ताभावाने?

**प्रश्नकर्ता :** परंतु असे म्हटले आहे ना, की कर्म आणि कर्तव्यानेच मोक्ष मिळतो?

**दादाश्री :** तुम्ही जे काही कर्म करता ते कर्म तुम्ही स्वतः करत नाहीत, पण तुम्हाला असे वाटते की 'मी करत आहे.' मग याचा कर्ता कोण आहे? तर चंदुभाऊ (चंदुभाईच्या जागी वाचकांने स्वतःचे नाव समजावे) आहेत. जर तुम्ही चंदुभाऊ आहात तर मात्र तुम्ही कर्माचे कर्ता आहात आणि जर 'तुम्ही' जर 'आत्मा' झालात तर तुम्ही कर्माचे कर्ता नाहीत. मग तुम्हाला कर्मे लागू पडत नाहीत. तुम्ही 'मी चंदुभाऊ आहे' असे बोलून करता. परंतु वास्तविक तुम्ही चंदुभाऊ नाहीच, म्हणून कर्मे लागू पडतात.

**प्रश्नकर्ता :** चंदुभाऊ तर लोकांसाठी आहोत, पण आत्माच कर्म करवितो ना?

**दादाश्री :** नाही. आत्मा काहीच करवीत नाही. आत्मा यात हस्तक्षेप करतच नाही. ओन्ली सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्सस् (फक्त वैज्ञानिक संयोगी पुरावे) हे सर्व करत असतात. आत्मा, हाच परमात्मा आहे. तुम्ही जर आत्म्याला ओळखले तर तुम्ही परमात्मा व्हाल. परंतु तुम्हाला अजून आत्म्याची ओळख झालीच नाही ना! यासाठी तर आत्म्याचे ज्ञान असायला हवे.

**प्रश्नकर्ता :** त्यासाठी, म्हणजे आत्म्याची ओळख करून घेण्यासाठी तर वेळ लागतो ना? अभ्यास करवा लागतो ना?

**दादाश्री :** नाही, लाखो जन्म अभ्यास केल्यानेही ते शक्य होत नाही. 'ज्ञानी पुरुष' भेटले तरच तुम्हाला आत्म्याची ओळख होईल.

'मी केले' असे म्हटले की कर्मबंधन होते. 'हे मी केले' यात अहंकार आहे आणि अहंकाराने कर्मबंधन होते. जिथे अहंकारच नाही, 'मी केले' असे नाही, तिथे कर्मबंधन होतच नाही. जेवण सुद्धा चंदुभाऊ जेवतो. तुम्ही स्वतः जेवत नाही. सगळे जण म्हणतात की 'मी जेवलो', पण ह्या सर्व चुकीच्या गोष्टी आहेत.

**प्रश्नकर्ता :** मग हे सर्व चंदुभाऊ करतो का?

**दादाश्री :** हो, चंदुभाऊ खातो आणि चंदुभाऊ स्वतःच पुद्‌गल

आहे, तो आत्मा नाही. समजले का तुम्हाला? तुमचे सर्व कोण चालवतो? व्यवसाय कोण करतो

**प्रश्नकर्ता :** मीच चालवतो.

**दादाश्री :** अरे, तुम्ही कोण आहात चालविणारे? तुम्हाला शौचाला जाण्याची तरी शक्ती आहे का? कोणत्याही डॉक्टरला असते का?

**प्रश्नकर्ता :** कोणालाच नसते.

**दादाश्री :** एकदा आम्ही बडोद्यातील सर्व फॉरेन रिटर्न्ड (परदेशातून परतलेले) डॉक्टरांना बोलाविले होते, आणि त्यांना विचारले की 'तुमच्यातील कोणाला शौचाला जाण्याची शक्ती आहे का?' त्यावर ते म्हणाले, 'अहो, आम्ही तर बऱ्याच पेशन्टला करवून देतो.' मग आम्ही सांगितले की जेव्हा तुम्हाला शौचाला होणार नाही तेव्हा तुम्हाला समजेल की ती तुमची शक्ती नव्हती, त्यावेळी तुम्हाला दुसऱ्या डॉक्टराची गरज पडेल. स्वतःची शौचास जाण्याची देखील स्वतंत्र शक्ती नाही. आणि हे लोक तर म्हणतात, 'आम्ही आलो, आम्ही गेलो, आम्ही झोपलो, आम्ही हे केले, ते केले, आम्ही लग्न केले.' लग्न करणारा तू कोण आहेस? लग्न तर (आपोआपच) झाले होते, जे पूर्वनियोजित होते त्याचे ते आज रूपकात (प्रत्यक्षात) आले. तेसुद्धा तुम्ही केले नाही, तर निसर्गाने केले. सगळे जण अहंकार करतात की 'मी हे केले, मी ते केले', पण तुम्ही काय केले? शौचास जाण्याची सुद्धा शक्ती नाही. ही सगळी निसर्गाची शक्ती आहे. बाकी, सर्व भ्रांती आहे. दुसरी शक्ती तुमच्याकडून करवून घेते, आणि तुम्ही मानता 'मी केले.'

## कर्म, कर्मफळाचे विज्ञान

**दादाश्री :** तुमचे सर्व काही कोण चालविते?

**प्रश्नकर्ता :** कर्मानुसार सर्व चालत आहे. प्रत्येक मनुष्य कर्माने बांधला गेला आहे.

**दादाश्री :** मग ते कर्म कोण करवीत असतो?

**प्रश्नकर्ता :** आपला हा प्रश्न फार अवघड आहे. कित्येक जन्मांपासून कर्मांचे चक्र चालूच आहे. मला कर्मांची थिअरी (सिद्धांत) समजवा ना!

**दादाश्री :** रात्री 11 वाजता तुमच्या घरी चार-पाच पाहुणे आले, तर तुम्ही त्यांना काय म्हणता, 'या, या, बसा.' आणि तुमच्या मनात काय चालू असते, 'हे आता कुठून आले? एवढ्या रात्री?' असे नाही का होत? तुम्हाला आवडत नसेल तरी पण तुम्ही खुशी दाखवता ना?

**प्रश्नकर्ता :** नाही, मनात तर त्यांच्यावर राग येतो.

**दादाश्री :** आणि बाहेरून मात्र चांगला व्यवहार करता! हो, तर तेच कर्म आहे बाहेर जे करता ते कर्म नाही. आत जे होत असते तेच कर्म आहे. तो कॉज (कारण) आहे. त्याचा इफेक्ट (परिणाम) येईल. कधी असे घडते की तुम्हाला तुमच्या सासूचा राग येतो?

**प्रश्नकर्ता :** मनात तर असे खूप होत असते.

**दादाश्री :** तेच कर्म आहे. जे आत होत असते तेच कर्म आहे. कर्माला दुसरा कोणी पाहू शकत नाही. आणि दुसरा कोणी पाहू शकतो, ते तर कर्मफळ आहे. परंतु जगाचे लोक तर जे डोळ्यांनी दिसते, की तुम्ही रागावलात, त्यालाच कर्म म्हणतात. तुम्ही रागावलात म्हणून सासूने तुम्हाला मारले. त्याला हे लोक कर्माचे फळ आले असे म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** या जन्मात जे काही राग-द्वेष होतात त्याचे फळ याच जन्मात भोगावे लागते, की पुढच्या जन्मी भोगावे लागते? आम्ही जे काही चांगले कर्म करतो, वाईट कर्म करतो, त्याचे फळ या जन्मात मिळते की पुढच्या जन्मात मिळते?

**दादाश्री :** असे आहे, चांगले केले किंवा वाईट केले ते (स्थूल) कर्म आहे. त्याचे फळ तर याच जन्मात भोगावे लागते. लोक बघतात की ह्याने वाईट कर्म केले, चोरी केली, ह्याने लबाडी केली, त्याने धोका

दिला, ती सर्व स्थूल कर्मे आहेत, जी लोक पाहू शकतात अशा कर्मांचे फळ इथेच भोगावे लागते. आणि ते कर्म करतेवेळी जे राग-द्वेष उत्पन्न होतात, ते पुढच्या जन्मी भोगावे लागतात. राग-द्वेष ही सूक्ष्म बाब आहे, आणि तीच योजना आहे. नंतर ती योजना रूपकामध्ये येईल, आता कागदावर आहे, नकाशात आहे, तीच प्रत्यक्षात येईल, आणि जे आता प्रत्यक्षात आले ते (स्थूल) कर्म आहे. ज्याला दुसरा कोणी पाहू शकतो की ह्याने शिवी दिली, ह्याने मारले, ह्याने पैसे दिले नाही. ते सर्व इथल्या इथेच भोगावे लागते. हे बघा, मी तुम्हाला समजावतो की हे कशा प्रकारे चालत आहे.

एक 13 वर्षाचा मुलगा आहे. त्याचे वडील त्याला म्हणाले, 'तू हॉटेलमध्ये जेवायला का जातोस? तुझी तब्येत बिघडेल. तुला वाईट संगत लागली आहे, असे करणे योग्य नाही.' असे वडील मुलाला खूप रागवतात. मुलालाही मनात खूप पश्चाताप होतो, आणि तो निश्चय करतो की मी आता कधीच हॉटेलात जाणार नाही. परंतु त्याला तो वाईट संगतीचा माणूस परत भेटला की तो सर्व विसरतो, किंवा हॉटेल पाहिली की तो हॉटेलात शिरतो. तो त्याच्या मर्जीने असे करत नाही, परंतु हे त्याचे उदयकर्म आहे. आपले लोक काय म्हणतात, की तो घाण खात आहे. अरे, पण तो बिचारा काय करील! हे तर त्याच्या उदयकर्माप्रमाणे घडत असते. तुम्ही त्याला रागवायचे सोडू नका. पण नाटकी बोलावे, 'बाबा रे, असे करू नकोस, तुझी तब्येत बिघडेल.' परंतु तिथे तर तुम्ही खरेच बोलू लागता की 'नालायक आहेस, बदमाश आहेस', आणि त्याला मारता सुद्धा. असे करू नये. त्याने तर यू आर अनफिट टू बी ए फादर (वडील होण्यासाठी तुम्ही अयोग्य आहात.) असे सिद्ध होते. योग्यता तर असायला हवी ना? अनक्वालिफाइड फादर ॲन्ड मदर (अपात्र आई-वडील) चालतील का? क्वालिफाइड असायला नको का?

ह्या मुलाने हॉटेलचे खाल्ले याला लोक म्हणतात की, 'त्याने कर्म बांधले.' कारण लोकांना पुढची गोष्ट समजत नाही. खरे तर खाल्ले

जाते ते त्या मुलाच्या इच्छेविरुद्धच होत असते, पण लोक त्याला कर्म असे म्हणतात. खाल्लेल्याचा परिणाम म्हणून पोटात मुरडा होतो, तेव्हा म्हणतात, 'तू हॉटेलात खात होतास, हे वाईट कर्म केल्यामुळे असे झाले.' हा कर्माचा परिणाम आहे. ह्या जन्मी जे कर्म केले त्याचा परिणाम ह्या जन्मातच भोगावा लागतो.

**प्रश्नकर्ता :** ह्या जन्मी आम्ही नवीन कर्मे कशी काय बांधू? कारण आता तर आम्ही मागील जन्माची कर्मे भोगत आहोत. जो मागील जन्माची कर्मे भोगत आहे तो नवीन कर्मे कसे बांधू शकतो?

**दादाश्री :** हा 'सरदारजी' आहे तो सध्या मागील कर्मे भोगत आहे, पण त्याच वेळी आत नवीन कर्मेसुद्धा बांधत आहे. तुम्ही जेवण जेवताना काय म्हणता 'जेवण खूप छान आहे.' आणि नंतर त्यात खडा आला तर काय होईल?

**प्रश्नकर्ता :** डोके फिरेल.

**दादाश्री :** मिठाई खाल्ली जाते ते मागील जन्माचे कर्म आहे आणि आज ती मिठाई चांगली वाटते, खुश होऊन खातो, घरच्यांवरही खुश होतो, त्यामुळे त्याला राग (आसक्ति, मोह) होतो. आणि मग जेव्हा तोंडात खडा येतो तेव्हा नाखुश होऊन जातो. त्यामुळे पुढील जन्माचे कर्म बांधले जाते. नाही तर जेवण जेवण्यास काहीच हरकत नाही. हलवा खा, काहीही खा, पण खुश-नाखुश होता कामा नये. जे काही ताटात आले ते खावे.

**प्रश्नकर्ता :** ते ठीक आहे, पण आज तो मागील वाईट कर्म भोगत आहे, तर मग त्याचा नवीन जन्म चांगला कसा असेल?

**दादाश्री :** समजा आता एखाद्या माणसाने तुमचा अपमान केला, तर ते मागील जन्माचे फळ आले. तो अपमान तुम्ही सहन करून घेतला, अगदी शांत राहिला आणि त्यावेळी जर ज्ञान हजर झाले की 'शिव्या देणारा तर निमित्त आहे, आणि माझे जे कर्म होते त्याचेच तो फळ देत आहे, यात त्याचा काय दोष?' तर मग तुम्ही पुढचे कर्म

चांगले बांधता. उलट जर दुसऱ्या एखाद्याचा कोणी अपमान केला, तर तोसुद्धा कसेही करून समोरच्याचा अपमान करतोच, त्यामुळे तो वाईट कर्म बांधतो.

**प्रश्नकर्ता :** दादाश्री तुम्ही तर लोकांना ज्ञान देत असता, म्हणजे तुम्ही चांगलेच कर्म बांधत असता ना?

**दादाश्री :** आम्हाला कधी कर्मबंधन होतच नाही. आणि आम्ही ज्यांना ज्ञान दिले आहे, त्यांनाही कर्मबंधन होत नाही. परंतु जोपर्यंत ज्ञान मिळाले नाही तोपर्यंत आम्ही सांगितल्याप्रमाणे करावे लागते, त्याने चांगले फळ मिळेल. जिथे पाप बांधले जात होते तिथेच पुण्य बांधले जाईल आणि यालाच धर्म म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** आम्ही दान-पुण्य करतो, तर त्याचे फळ पुढील जन्मात मिळावे म्हणून करतो का? हे खरे आहे का?

**दादाश्री :** हो, हे खरे आहे. चांगले कराल तर चांगले फळ मिळेल आणि वाईट केले तर वाईट फळ मिळेल. यात इतर कोणाचाही अडथळा नसतो. इतर कुठलाही जीव किंवा देव तुमच्यात अडथळा निर्माण करू शकत नाही, तुम्हीच निर्माण केलेले अडथळे आहेत. तुमच्याच कर्मांचा हा परिणाम आहे. पूर्वी तुम्ही जसे केले आहे तेच तुम्हाला मिळत आहे, चांगले-वाईट याचा पूर्ण अर्थ याप्रमाणे होतो की समजा तुम्ही पाच हजार रुपये देवाच्या मंदिरासाठी दिले आणि ह्या गृहस्थानेसुद्धा पाच हजार रुपये मंदिरासाठी दिले. तरी याचे फळ दोघांना वेगवेगळेच मिळेल. तुमची खूपच इच्छा होती की, 'मला देवाच्या मंदिरासाठी काही द्यायचे आहे. माझ्याजवळ पैसे आहेत तर ते पैसे चांगल्या मार्गाने वापरले जावेत.' असे करण्याचे तुमच्या मनात होते. आणि तुमच्या मित्रानेही पैसे दिले, पण दिल्यानंतर तो काय म्हणाला 'खरे तर मेयरने जबरदस्ती केली म्हणून मला द्यावे लागले, नाही तर मी दिलेच नसते' असा भाव असल्यामुळे त्याचे चांगले फळ मिळत नाही. याउलट तुम्हाला संपूर्ण फळ मिळेल. अर्थात मनात जसे भाव असतात तसेच फळ मिळते. आणि तुम्हाला संपूर्ण फळ मिळेल.

**प्रश्नकर्ता :** नाव कमावण्याची लालूच नसावी.

**दादाश्री :** नाव हे तर फळ आहे. तुम्ही तुमच्या कीर्तीसाठी पाच हजार दिलेत, तर तुम्हाला जेवढी कीर्ती मिळाली, तेवढे फळ कमी झाले. कीर्ती मिळाली नाही तर पूर्ण फळ मिळेल. तिथे मग चेक विध इंटरेस्ट (व्याजासकट चेक) पूर्ण बोनस मिळेल. नाही तर अर्धे फळ तर कीर्ती मिळवण्यातच जाते, मग बोनस पण अर्धाच मिळेल. कीर्ती तर तुम्हाला इथल्या इथेच मिळते. लोक म्हणतात 'ह्या शेठने पाच हजार दिले, पाच हजार दिले.' आणि तुम्ही खुश होता. दान तर गुप्त असले पाहिजे. चढाओढीमुळे दान दिले, स्पर्धेत येऊन दान दिले, तर त्याचे पूर्ण फळ मिळत नाही. एखाद्या व्यक्तीने देवाकडे एकच रुपया गुप्तपणे दिला आणि दुसऱ्या एखाद्याने वीस हजार देऊन स्वतःच्या नावाची पाटी लावून घेतली तर त्याचे फळ त्याला इथल्याइथेच मिळाले. इथेच त्याला यश, कीर्ती, वाह-वाह मिळाली. त्याचे पेमेंट पाटी लावण्यातच खर्च झाले, त्यामुळे मग शिल्लक उरलीच नाही. तात्पर्य हेच की तुम्ही एक रुपया द्या, पण कोणालाही कळणार नाही असे द्या. पाटी लावून घेतली नाही तर फार उत्तम फळ मिळते. मंदिराच्या सर्व भिंतींवर पाट्या लावलेल्याच असतात. त्याला काय अर्थ आहे. कोण वाचणार त्या पाट्या? कोणीही वाचत नाही.

दान म्हणजे कोणत्याही जीवाला सुख देणे. मनुष्य असो किंवा कुठलेही जनावर असो, त्या सर्वांना सुख देणे याला दान म्हणतात. दुसऱ्यांना सुख दिले तर त्याच्या रिॲक्शन (प्रतिक्रिया)मुळे आपल्याला सुख मिळते, आणि दुःख दिले तर दुःख मिळते. अशा प्रकारे घर बसल्याच तुम्हाला सुख-दुःख मिळेल. इतर काही देता आले नाही तर त्याला खाऊ घाला, जुने कपडे द्या. त्यामुळे त्याला शांती वाटेल. कोणाच्या मनाला सुख दिले तर आपल्या मनाला सुख प्राप्त होते. हा सर्व तर व्यवहार आहे. कारण जीवमात्राच्या आत परमात्मा आहे म्हणून आपण त्याच्या बाहेरच्या कामाकडे बघू नये, पण त्याला मदत करावी. त्याला मदत केली तर त्या मदतीच्या परिणाम स्वरूप आपल्यालाही सुख मिळेल. आणि दुःख दिले तर दुःखाच्या परिणाम स्वरूप आपल्यालाही

दु:ख मिळेल. म्हणून रोजच सकाळी असे निश्चित केले पाहिजे की, 'माझ्या मन-वचन-कायेने कोणत्याही जीवाला किंचितमात्रही दु:ख न होवो, न होवो, न होवो.' आणि आपल्याला जर कोणी दु:ख दिले तर ते आपल्या वहीखात्यात जमा करून टाकावे. नंदलालने तुम्हाला दोन शिव्या दिल्या तर तुम्ही नंदलालच्या खात्यात जमा करा. कारण मागील जन्मी तुम्हीच उधार दिले होते. मागील जन्मी तुम्ही त्याला दोन शिव्या दिल्या होत्या, त्या दोन शिव्या तो आज परत करून गेला. आज परत तुम्ही पाच शिव्या दिल्या तर तो पुन्हा पाच शिव्या देईल. तुम्हाला जर असा व्यापार आवडत नसेल तर उधार देणे बंद करा.

कोणी तुमचे नुकसान करतो, खिसा कापतो, तो सर्व तुमचाच परिणाम आहे. तुम्ही जेवढे दिले होते तेवढेच परत येते. हे सर्व नियमानुसारच आहे. या जगात नियमाबाहेर काहीच घडत नसते. ही सर्व स्वत:चीच जबाबदारी आहे. यू आर होल ॲन्ड सोल रिस्पोन्सिबल फॉर युवर लाईफ. (तुमच्या जीवनासाठी तुम्हीच पूर्णपणे जबाबदार आहात.) आणि ती फक्त एका जन्मासाठी नाही तर अनंत जन्मासाठी आहे. म्हणूनच जीवनात खूपच जबाबदारीने वागावे. वडिलांप्रती, आईप्रती, पत्नीप्रती, मुलांप्रती, सर्वांप्रती तुमची जबाबदारी आहे. आणि या सगळ्यांशी तुमचे कोणते नाते आहे? तर ग्राहकाचे व्यापाऱ्याशी जे नाते असते, तसेच हे नाते आहे.

**प्रश्नकर्ता :** आता मी जर एखादे कार्य केले तर त्याचे फळ मला याच जन्मात मिळेल की पुढच्या जन्मी मिळेल?

**दादाश्री :** जेवढी कर्मे डोळ्यांनी दिसतात त्यांचे फळ तर इथेच, ह्या जन्मातच मिळेल, आणि जे डोळ्यांनी दिसत नाहीत, आतल्या आतच होतात त्या कर्मांची फळे पुढील जन्मात मिळतील.

एक मुस्लीम गृहस्थ आहे. त्याला पाच मुले आणि दोन मुली आहेत. त्याच्याजवळ पैसे पण नाहीत. एके दिवशी त्याची बायको त्याला म्हणाली, 'आपल्या मुलांना मांस खाऊ घाला.' त्यावर तो म्हणाला, 'माझ्याजवळ पैसेच नाहीत.' मग मी कुठून आणू? नंतर त्याने विचार

केला की जंगलात हरीण असतात, तर मी हरीण मारून आणीन आणि मुलांना खाऊ घालेन. मग त्याने एक हरीण मारून आणले आणि मुलांना मांस खाऊ घातले. दुसरा एक शिकारी होता. त्याला शिकार करण्याचा शौक होता. तोसुद्धा जंगलात गेला आणि त्यानेही हरीण मारले. मारल्यावर तो खुश झाला आणि म्हणाला 'बघा, एकाच गोळीत मी ह्याला ठार मारले.'

आता त्या मुसलमानाने मुलांना जेवायला काहीच नव्हते म्हणून हरीण मारले, पण मनात तर त्याला असे करणे ठीक वाटत नव्हते, त्यामुळे त्याचा गुन्हा 20 टक्के आहे. 100 टक्के हे नॉर्मल आहे, तर मुसलमानाला 20 टक्के गुन्हा लागू झाला आणि त्या शिकाऱ्याने फक्त शौकसाठी मारले तर त्याला 150 टक्के गुन्हा लागू झाला. क्रिया तर एकसारखीच आहे, परंतु त्याचे गुन्हे वेगवेगळे आहेत.

**प्रश्नकर्ता :** याचा अर्थ कोणाला दुःख देऊन जो खुश होतो, तो 150 टक्के गुन्हा करतो?

**दादाश्री :** तो शिकारी खुश झाला म्हणून त्याचे 50 टक्के वाढले. जर खुश झाला नसता तर 100 टक्के गुन्हा असता. याउलट त्या मुसलमानाने पश्चाताप केला म्हणून त्याचा गुन्हा 80 टक्के कमी झाला. जो कर्ता नाही त्याला गुन्हा लागू होतच नाही. जो कर्ता आहे त्यालाच गुन्हा लागू होतो.

**प्रश्नकर्ता :** अजाणतेपणी पाप झाले असेल तर त्याला पाप म्हणत नाही ना?

**दादाश्री :** नाही, अजाणतेपणी पण तेवढेच पाप असते. हा विस्तव आहे, या विस्तवावर चुकून जर एखाद्या लहान मुलाचा हात पडला तर काही फळ येईल का?

**प्रश्नकर्ता :** हो, हात भाजेल.

**दादाश्री :** म्हणजे फळ सारखेच असते. जाणतेपणी करा किंवा

अजाणतेपणी करा, फळ सारखेच असते, पण ते फळ भोगते वेळी हिशोब वेगळा असतो. भोगण्याची वेळ येते तेव्हा ज्याने जाणतेपणी केले आहे त्याला जाणतेपणी भोगावे लागते आणि ज्याने अजाणतेपणी केले आहे त्याला अजाणतेपणी भोगावे लागते. एक तीन वर्षाचे मूल आहे त्याची आई मृत्यू पावली आणि दुसरा बावीस वर्षाचा मुलगा आहे त्याचीही आई मृत्यू पावली, म्हणजे आई तर दोघांचीही मृत्यू पावली पण लहान मुलाला अजाणतेपणी फळ मिळाले आणि त्या मोठ्या मुलाला जाणतेपणी फळ मिळाले.

**प्रश्नकर्ता :** मनुष्य ह्या जन्मात जी काही कृत्ये करतो, काही चुकीची कृत्येही करतो, तर त्याचे फळ त्याला कशा प्रकारे मिळते?

**दादाश्री :** एखादा मनुष्य चोरी करतो याला भगवंतांची काहीच हरकत नाही. परंतु चोरी करते वेळी जर त्याला असे वाटत असेल की, 'इतके वाईट काम माझ्या वाट्याला का आले? मला हे काम करायचे नाही पण मला ते करावे लागत आहे.' आणि जर त्याने आतील परमात्म्याला प्रार्थना केली तर त्याला त्या चोरीचे फळ मिळणार नाही. जो गुन्हा दिसत आहे तो गुन्हा करतेवेळी त्याच्या आत काय चालले आहे, हे पाहण्याची गरज आहे. त्यावेळी जर तो अशी प्रार्थना करत असेल तर तो गुन्हा, गुन्हा ठरत नाही, तो सुटतो. यू आर होल ॲन्ड सोल रिस्पोन्सिबल फॉर युवर डीड्स! (तुझ्या कृत्यांसाठी तूच पूर्णपणे जबाबदार आहेस.) तुम्ही आज जसे कराल तसेच फळ पुढे येईल. ते तुमच्या कर्माचे फळ आहे.

**प्रश्नकर्ता :** आज चांगले काम केले तर पुढच्या जन्मी त्याचे चांगले (फळ) मिळेल की याच जन्मात मिळेल?

**दादाश्री :** हो, ह्या जन्मात पण चांगले मिळते. तुम्हाला आत्ताच ह्याची चाचणी करायची आहे का? चाचणी करायची असेल तर एखाद्या माणसाला दोन-चार थोबाडीत मारून, शिव्या देऊन घरी जा, मग काय होईल?

**प्रश्नकर्ता :** काही ना काही परिणाम येईलच.

**दादाश्री :** नाही, मग तर झोपच येणार नाही. तुम्ही ज्याला शिवी दिली, थोबाडीत मारल्या त्याला तर झोप येणार नाही पण तुम्हालाही झोप येणार नाही. आणि जर तुम्ही त्याला आनंद होईल असे काही तरी करून घरी गेलात तर तुम्हालाही आनंद वाटेल. दोन प्रकारची फळे मिळतात. चांगले केले तर गोड फळ मिळते आणि कोणाबद्दल वाईट बोलले तर त्याचे कडू फळ मिळते. कोणाबद्दलही वाईट बोलू नका, कारण प्रत्येक जीवात परमात्माच (विराजमान) आहे.

**प्रश्नकर्ता :** पण चांगले केले त्याचे फळ या जन्मात तर मिळत नाही ना?

**दादाश्री :** चांगले केले त्याचे फळ तर आत्ताच (लगेचच) मिळते. पण जे चांगले केले, तेसुद्धा फळच आहे. तुम्ही भ्रांतीमुळे असे बोलता की 'मी चांगले केले.' मागील जन्मात चांगले करण्याचा विचार केला होता, त्याचे फळ स्वरूप आता चांगले केले जाते. जन्मापासून आयुष्यभर ते फळ मिळत राहते. तुम्हाला 53 वर्षे झाली, आतापर्यंत जी नोकरी मिळाली ते देखील फळच होते. शरीराला किती सुख आहे, किती दु:ख आहे तेही फळच आहे. आई-वडील मिळाले, पत्नी मिळाली, मुलगी मिळाली, घर मिळाले, हे सर्व फळच मिळालेले आहे.

**प्रश्नकर्ता :** जर कर्माचेच फळ मिळत असेल तर त्यात काही तरी सुसंगत असले पाहिजे ना?

**दादाश्री :** हो, सुसंगतच. दिस वर्ल्ड इज एवर रेग्युलर (हे जग नेहमीच सुसंगत असते.)

**प्रश्नकर्ता :** कर्मे तर इथेच भोगावी लागतात ना?

**दादाश्री :** हो, जी स्थूल कर्मे आहेत, डोळ्यांनी दिसतील अशी कर्मे आहेत, ती सर्व इथेच भोगावी लागतात. आणि जी डोळ्यांनी दिसत नाहीत अशी सूक्ष्म कर्मे ती पुढच्या जन्मात भोगावी लागतात.

**प्रश्नकर्ता :** कर्माचा उदय येतो तेव्हा त्यात तन्मयाकार झाल्याने भोगावे लागते की तन्मयाकार न झाल्याने?

**दादाश्री :** उदयात जो तन्मयाकार होत नाही तो ज्ञानी आहे. अज्ञानी उदयात तन्मयाकार झाल्याशिवाय राहतच नाही. कारण अज्ञानीकडे एवढी शक्ती नाही की तो तन्मयाकार होणार नाही. हो, अज्ञानी कुठल्या जागी तन्मयाकार होत नाही? जी गोष्ट त्याला आवडत नसेल तिथे तो तन्मयाकार होत नाही. आणि जी गोष्ट खूप आवडत असेल तिथे तो तन्मयाकार होऊनच जातो. पण जी गोष्ट आवडत असेल त्यात जर तन्मयाकार झाला नाही, तर तो पुरुषार्थ म्हणायचा.

सगळे लोक सांगतात ना की कर्मे बांधली जातात. तर कर्म बांधणे म्हणजेच कर्म चार्ज होणे. चार्ज करते वेळी कर्ता असतो आणि डिस्चार्ज होते वेळी भोक्ता असतो. आम्ही ज्ञान दिल्यानंतर मात्र कर्ता होणार नाही, फक्त भोक्ताच राहील. कर्ता झाला नाही तर चार्ज होणे बंद होईल, फक्त डिस्चार्जच राहील. हे विज्ञान आहे. आमच्याकडे संपूर्ण जगाचे विज्ञान आहे. तुम्ही कोण आहात? मी कोण आहे? हे सर्व कसे चालत आहे? कोण चालवितो? ते सर्व विज्ञान आहे.

**प्रश्नकर्ता :** मनुष्य मृत्यू पावतो तेव्हा शरीर आणि आत्मा वेगळे होऊन जातात, तर तेव्हा आत्मा दुसऱ्या शरीरात जातो की परमेश्वरात विलीन होऊन जातो? आणि जर तो दुसऱ्या शरीरात जात असेल तर काय तो कर्मामुळे जातो?

**दादाश्री :** हो, दुसरे कोणीच नाही, कर्मेच त्याला घेऊन जातात, त्या कर्मांने पुद्‌गल भाव होतात. पुद्‌गल भाव म्हणजे प्राकृत भाव, ते जर हलके असतील तर तो देवगतीत, ऊर्ध्वगतीत जातो, नॉर्मल असतील तर येथेच, मनुष्यांमध्येच राहतो, सज्जनांमध्ये राहतो. आणि प्राकृत भाव संपले की मोक्षाला जातो.

**प्रश्नकर्ता :** एखादा मनुष्य मृत्यू पावला पण त्याची एखादी इच्छा बाकी राहिली असेल, तर ती इच्छा पूर्ण करण्यासाठी तो काय प्रयत्न करतो?

**दादाश्री :** त्याला जर आपले हे 'ज्ञान' मिळाले असेल आणि

जर त्याची इच्छा बाकी राहिली असेल, तर शक्यतोवर त्याचा जन्म देवगतीतच होतो. किंवा मग खूप सज्जन मनुष्याचा किंवा योगभष्ट मनुष्याचा जन्म मिळतो. पण त्याची इच्छा मात्र पूर्ण होते. इच्छेचे सर्व सरकमस्टेन्शियल एविडन्सेस् पूर्ण होतात. मोक्षाला जाण्यापूर्वी जशी इच्छा असेल त्यानुसार एक-दोन जन्मात सर्व संयोग जुळून येतात. आणि सर्व इच्छा पूर्ण झाल्यावर मोक्षाला जातो. जेव्हा सर्व इच्छा पूर्ण होतात तेव्हा तो परत मनुष्य गतीत येऊन मोक्षाला जातो. पण त्याला मनुष्य जन्म इथे या क्षेत्रात मिळणार नाही, दुसऱ्या क्षेत्रात मिळतो. या क्षेत्रात सध्या कोणी तीर्थंकर भगवंत नाहीत. तीर्थंकर भगवंत, पूर्ण केवलज्ञानी भगवंत असले पाहिजेत, तर तिथे जन्म होईल आणि त्यांच्या दर्शनानेच मोक्ष प्राप्त होईल, फक्त दर्शनानेच. कारण ऐकायचे काहीच शिल्लक राहिलेले नाही, स्वतः सर्व काही समजून घेतले आहे पूर्ण तयारी आहे म्हणून फक्त दर्शन, संपूर्ण वीतराग दर्शन झाले की मोक्ष प्राप्त होतो.

**प्रश्नकर्ता :** मनुष्याच्या इच्छा दोन प्रकारच्या असू शकतात, एक आध्यात्मिक आणि दुसरी आधिभौतिक. आध्यात्मिक प्राप्त झाल्यानंतर जर काही आधिभौतिक इच्छा बाकी उरल्या असतील आणि त्या जर ह्याच जन्मात पूर्ण करून टाकल्या, तर मग पुढच्या जन्माचा प्रश्नच राहत नाही ना?

**दादाश्री :** नाही, त्या ह्या जन्मात पूर्ण झाल्या नाही तर पुढच्या जन्मी पूर्ण होतील.

**प्रश्नकर्ता :** ह्याच जन्मातच पूर्ण केल्या तर त्यात काय वाईट आहे?

**दादाश्री :** त्या पूर्ण होतील असे शक्यच नाही, कारण तसे एविडन्सेस् मिळणे शक्य नाही. त्यासाठी पूर्ण एविडन्सेस् असले पाहिजेत, अगदी शंभर टक्के एविडन्सेस् असले पाहिजेत.

**प्रश्नकर्ता :** आता आम्ही आध्यात्मिक तर करत आहोत पण

त्याचबरोबर सर्व सांसारिक इच्छा पण पूर्ण करून घेतल्या तर त्यात काय वाईट आहे?

**दादाश्री :** पण त्या पूर्ण होऊ शकत नाही ना! त्या पूर्ण होत नाहीत, कारण इथे तसा काळ पण नाही! शंभर टक्के एविडन्सेस् मिळतच नाहीत. त्यामुळे इथे इच्छा पूर्ण होऊ शकत नाहीत, अजून एक-दोन जन्म तरी बाकी राहतात. तेव्हा त्या सर्व इच्छा अगदी संतुष्टीने पूर्ण होतात, आणि मग त्याला त्या इच्छेचा वीट येतो. तेव्हा मग तो केवळ शुद्धात्म्यातच राहतो. इच्छा तर पूर्ण झाल्याच पाहिजेत, त्याशिवाय प्रवेश मिळतच नाही. इथून डायरेक्ट मोक्ष होत नाही. एक-दोन जन्म बाकी राहतात. आणि ते खूप चांगले जन्म असतात, तेव्हा तिथे सर्व इच्छा पूर्ण होतात. सध्या इथे सर्व इच्छा पूर्ण होतील असा काळही नाही आणि असे क्षेत्रही नाही. इथे सच्चा प्रेम असलेला, पूर्ण प्रेममय मनुष्यच भेटत नाही, तर मग आपल्या इच्छा कशा पूर्ण होतील? त्यासाठी एक-दोन जन्म बाकी राहतात आणि शुद्धात्म्याचे लक्ष प्राप्त झाल्यावर असे पुण्य बांधले जाते की सर्व इच्छा पूर्ण होतात. असे शंभर टक्के पुण्य असते.

## कर्तापद की आश्रितपद?

फक्त माणसेच कर्म करतात, इतर कोणीच कर्म करत नाही. माणसे निराश्रित आहेत म्हणून ती कर्म करतात. इतर सर्व, गायी, म्हशी, झाडे, देवी-देवता, नरकवाले, सर्वच आश्रित आहेत. ते कुठलेही कर्म करीत नाहीत, कारण ते देवाचे आश्रित आहेत. फक्त ही माणसे निराश्रित आहेत. देव ह्या माणसांची जबाबदारी घेतच नाही. इतर सर्व जीवांची जबाबदारी मात्र देवाने घेतलेली आहे.

**प्रश्नकर्ता :** माणसाने स्वतःला ओळखले की मग तो निराश्रित नाही.

**दादाश्री :** मग तर तो परमात्माच झाला! स्वतःला ओळखण्याची तयारी करतो तेव्हापासूनच परमात्मा होण्याची सुरुवात होते. तेव्हापासून

तो अंश रूपात परमात्मा होतो, नंतर दोन अंश, तीन अंश, असे करत करत सर्वांश पण होऊन जातो. मग तो निराश्रित नाही, तो स्वत:च परमात्मा आहे. परंतु ही सर्व माणसे निराश्रित आहेत. जे खाण्यासाठी, पैशांसाठी, मौज करण्यासाठी परमात्म्याची भक्ती करतात, ते सर्वच निराश्रित आहेत.

मनुष्य निराश्रित कसा आहे याचा किस्सा सांगू का? गावातील एक मोठा शेठ, एक साधू महाराज आणि शेठचा कुत्रा, हे तिघेही बाहेरगावी जात होते. वाटेत त्यांना चार डाकू भेटले शेठ घाबरले, त्यांना वाटले, 'माझ्याजवळ दहा हजार रुपये आहेत, ते जर ह्यांनी हिसकावून घेतले आणि मला मारहाण केली तर माझे काय होईल?' शेठ तर निराश्रित होऊन गेले. साधू महाराजांकडे तर काहीच नव्हते, खाण्यासाठी एक भांडे तेवढे होते. त्यांना विचार आला की हे भांडे लुटून घेतले तर हरकत नाही, पण मला मारले आणि माझा पाय-बिय मोडला तर माझे काय होईल? मग मी काय करणार? आणि तो कुत्रा होता तो भुंकू लागला. डाकूने त्याला एकदा काठीने मारले तर तो भुंकत भुंकत पळून गेला, नंतर परत येऊन भुंकू लागला. 'माझे काय होईल' असा विचार त्याच्या मनात येतच नाही. कारण तो आश्रित आहे. शेठ आणि साधू महाराज दोघांनाही मनात असे येते की, 'माझे काय होईल?' मनुष्यच कर्ता आहे आणि तोच कर्म बांधतो. इतर कुठलाही जीव कर्ता नाही, ते सर्व तर कर्मातून सुटत असतात. आणि ही माणसे तर कर्म बांधतातही आणि कर्मातून सुटतातही. माणसांमध्ये चार्ज आणि डिस्चार्ज दोन्हीही होत असतात डिस्चार्ज होते वेळी तर काही काळजी करण्याची गरज नाही, चार्ज होताना मात्र काळजी घ्यावी.

हे फॉरेनवाले सगळे सहज आहेत, ते निराश्रित नाहीत. ते तर आश्रित आहेत. 'आम्ही कर्ता आहोत.' असे ते बोलत नाहीत, याउलट हिंदुस्तानातील लोक तर कर्ता झाले आहेत.

## निष्काम कर्माने कर्मबंधन?

गीतेमध्ये श्रीकृष्ण भगवंताने सर्व मार्ग दाखविले आहेत. सर्व

काही धर्माबद्दलच लिहिले आहे. पण मोक्षाला जाण्यासाठी एकच वाक्य लिहिले आहे, जास्त लिहिले नाही. कुठला धर्म पाळायचा? तर निष्काम कर्म करण्याचा, त्याला धर्म म्हणतात. पण कर्ता आहेच ना? निष्काम आहे, तरी पण कर्ता तर आहेच ना?

**प्रश्नकर्ता :** मग कर्मच मुख्य आहे ना?

**दादाश्री :** पण पूर्वी सकाम कर्म करत होता आणि आता निष्काम कर्म करत आहे, त्यामुळे धर्म मिळेल पण मुक्ती मिळत नाही. सकाम कर्म करा किंवा निष्काम कर्म करा पण मुक्ती मिळत नाही. कर्म केल्याने मुक्ती मिळत नाही. मुक्ती तर, ज्यांच्यात भगवंत प्रकट झाले आहेत, त्यांची कृपा झाली तर मुक्ती मिळते.

**प्रश्नकर्ता :** पण काम केल्याशिवाय भगवंतांची कृपा होते का?

**दादाश्री :** काम केले तरीही भगवंतांची कृपा होत नाही आणि काम केले नाही तरीही भगवंतांची कृपा होत नाही. ज्याची भगवंताशी भेट होते त्याच्यावर भगवंतांची कृपा बरसतेच. काम आपल्या फायद्यासाठी करावे. निष्काम कर्म कशासाठी करावे? तर ते केल्यामुळे आपल्याला कोणतीही अडचण न येवो, पुढे पुढे धर्म करू शकू, खाण्या-पिण्याचे मिळावे, सर्व काही मिळावे आणि भगवंतांची भक्ती करण्यात कोणतीही अडचण येऊ नये. हा निष्काम कर्माचा फायदा आहे, तरी पण ही सर्व कर्मेच आहेत आणि जोपर्यंत कर्म आहे तोपर्यंत बंधन आहे.

श्रीकृष्णानी सांगितले आहे की स्थितप्रज्ञ झाल्यावर तो मुक्त होतो. आणि दुसरे हेही सांगितले आहे की वीतराग आणि निर्भय झाला तर (मोक्षाचे) काम होते.

जरी निष्काम केले, तरी पण कर्माचे कर्ता तर तुम्हीच आहात ना? आणि कर्ता आहे तोपर्यंत मुक्ती होत नाही. मुक्तीसाठी तर 'मी कर्ता आहे' ही मान्यताच सुटली पाहिजे, आणि कर्ता कोण आहे, हे समजून घेतले पाहिजे. करणारा कोण आहे? तुम्ही कोण आहात? हे सगळे कोण आहेत? हे सर्व आम्ही समजावतो. सगळे जण असेच

मानतात की 'आम्ही निष्काम कर्म करत आहोत आणि आम्हाला परमात्म्याची भेट होईल.' अरे, जोपर्यंत तुम्ही कर्ता आहात तोपर्यंत परमात्मा कसा भेटेल? जेव्हा अकर्ता व्हाल तेव्हाच परमात्मा भेटेल.

**प्रश्नकर्ता :** श्रीकृष्णाने पण युद्ध केले होते, कृष्ण अर्जुनाचे सारथी देखील बनले होते.

**दादाश्री :** हो, सारथी बनले होते, पण का बनले होते? भगवंत अर्जुनाला सांगत होते, 'हे बघ भाऊ, तू पाच घोड्यांचा लगाम तर पकडतोस पण रथ कसा चालवायचा हे तुला माहीतच नाही, आणि त्यामुळे तू सतत लगाम खेचत राहतोस. केव्हा खेचतोस? तर जिथे चढ असेल तिथे खेचतोस आणि जिथे उतार असेल तिथे सैल करतोस. सतत लगाम खेचत राहिल्याने घोड्याच्या तोंडातून रक्त येते. म्हणून तू रथामध्ये बस आणि मी तुझा रथ चालवीन.

आणि तुमचा कोण चालवितो? तुम्ही स्वतःच चालविता का?

**प्रश्नकर्ता :** आम्ही कसले चालविणारे? चालविणारा तर एकच आहे.

**दादाश्री :** कोण?

**प्रश्नकर्ता :** ज्याला आपण परमपिता परमेश्वर मानतो तो.

**दादाश्री :** श्रीखंड-पुरी तुम्ही खाता आणि चालवितो तो?!!

जोपर्यंत मनुष्य कर्मयोगात आहे तोपर्यंत भगवंताचा स्वीकार करावाच लागेल की, हे भगवंता, तुझ्या शक्तीने मी हे सर्व करीत आहे. नाही तर 'मी कर्ता आहे' असे केव्हा म्हणतो? तर जेव्हा कमावतो तेव्हा म्हणतो, 'मी कमावले' आणि जेव्हा नुकसान होते तेव्हा 'देवाने नुकसान केले' असे म्हणतो, 'माझ्या भागीदाराने केले, किंवा माझे ग्रहच असे होते, देव रुसला आहे', असे सर्व चुकीचे बोलत असतो. देवासाठी असे बोलू नये. हे सर्व देवच करत आहे. असे समजून निमित्तरूपाने काम केले पाहिजे.

कर्मयोग म्हणजे काय? तर देव कर्ता आहे आणि मी त्याचा निमित्त आहे. तो सांगेल तसे करावे. त्याचा अहंकार करू नाही. याला म्हणतात कर्मयोग. कर्मयोगात तर सर्व कामे आतून सांगितली जातात. तसेच तुम्ही करावे. बाहेर कोणाची भीती वाटता कामा नये की 'लोक काय म्हणतील?' सर्व काही देवाच्या नावानेच करावे. आपण काहीच करायचे नाही. आपण फक्त निमित्त रूपानेच करावे. तुम्ही तर देवाचे हत्यार आहात, अशा प्रकारे काम करावे.

## कर्म, कर्म चेतना, कर्मफळ चेतना

**प्रश्नकर्ता :** आपले कर्म कोण लिहितो?

**दादाश्री :** आपले कर्म लिहिणारा कोणीच नसतो. जसे मोठमोठे कंप्युटर रिजल्ट (परिणाम) देतात त्याचप्रमाणे आपोआपच तुम्हाला कर्मफळ मिळते.

कर्म म्हणजे काय? तर जमीनीत बी पेरतो त्याला कर्म म्हटले जाते आणि त्याचे जे फळ येते ते कर्मफळ आहे. कर्मफळ देण्याचे काम कंप्युटरप्रमाणे मशिनरी करत असते. जसे कंप्युटरमध्ये आपण जे काही (प्रश्न) टाकतो त्याचे उत्तर मिळते, ते कर्मफळ आहे. त्यात देव काहीच करत नाही.

**प्रश्नकर्ता :** मागील जन्माच्या कर्मांमुळे असे सर्व होत असते का?

**दादाश्री :** हो, आणखी दुसरे काय? मागील जन्माची जी कर्मे आहेत, त्यांचे ह्या जन्मात फळ मिळते. तुम्हाला नको असेल तरी फळ मिळतेच. त्याची फळे दोन प्रकारची असतात. एक कडू असते आणि एक गोड असते. काही दिवस कडू फळ मिळते तर ते तुम्हाला आवडत नाही. पण गोड फळ तुम्हाला आवडते. त्यामुळे नवीन कर्मे बांधली जातात. म्हणजे नवीन बीया पेरत राहतो आणि मागची फळे खात राहतो.

**प्रश्नकर्ता :** ह्या जन्मात आम्ही जी कर्मे करतो ती पुढच्या जन्मी परत येतील का?

**दादाश्री :** आता जी फळे खात आहे ती मागच्या जन्माची आहेत, आणि ज्याचे बी पेरत आहोत त्याचे फळ पुढच्या जन्मी मिळेल. जेव्हा कोणावर क्रोध येतो तेव्हा त्याचे वाईट बी पेरले जाते. मग जेव्हा त्याचे फळ येते तेव्हा आपल्याला खूप दु:ख भोगावे लागते.

**प्रश्नकर्ता :** मागचा जन्म आहे की नाही ते कसे कळेल?

**दादाश्री :** तुम्ही शाळेत शिकता तेव्हा सगळ्याच मुलांचा पहिला नंबर येतो की कोणा एकाचाच पहिला नंबर येतो?

**प्रश्नकर्ता :** कोणा एकाचाच पहिला नंबर येतो.

**दादाश्री :** दुसरे नंबर पण येतात ना?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** मग असा फरक कशाला? सर्वांचा सारखा नंबर का येत नाही?

**प्रश्नकर्ता :** जो जेवढा अभ्यास करतो तेवढेच मार्क्स त्याला मिळतात.

**दादाश्री :** नाही, काही विद्यार्थी जास्त अभ्यास करत नाहीत तरी पण प्रथम क्रमांकावर येतात. आणि काही तर पुष्कळ अभ्यास करतात तरी नापास होतात.

**प्रश्नकर्ता :** त्यांचा मेंदू (बुद्धी) चांगला असेल.

**दादाश्री :** मग ह्या सगळ्यांची बुद्धी वेगवेगळी का असते? तर ती मागील जन्माच्या कर्मांच्या फळानुसार असते.

**प्रश्नकर्ता :** जी मागील जन्माची गोष्ट आहे तिला या जन्मात सांगून काय फायदा? करणी-भरणी तर ह्या जन्मातच झाली पाहिजे ना? जेणे करून आम्हाला हे कळेल की आम्ही जे पाप केले त्याचे फळ आम्ही भोगत आहोत.

**दादाश्री :** हो, हो. तसेही आहे. पण हे कसे आहे की जी

कॉजेस (कारणे) केली आहेत त्याचे फळ काय मिळते? समजा एखाद्या लहान मुलाने कोणाला दगड मारला तर ती त्याची जबाबदारी आहे. पण त्याला माहीत नाही की त्याची काय जबाबदारी आहे. तो मागील जन्माच्या कर्मानुसार दगड मारतो. नंतर ज्याला तो दगड लागतो ती व्यक्ती ह्या मुलाला मारते, म्हणजे जो दगड मारला होता त्याचे फळ त्याला मिळाले.

एखादी व्यक्ती कोणावर रागावली, नंतर ती व्यक्ती म्हणते 'अहो, मला रागवायचे नव्हते, तरी पण राग आला.' तर मग हा राग कोणी केला? तर हा मागच्या कर्मांचा परिणाम आहे. तो रागावतो, हा मागच्या कॉजेसचा इफेक्ट आहे. पण भ्रांतीमुळे लोक काय म्हणतात? रागावला त्याला कर्म म्हणतात आणि मार खाल्ला ते त्या कर्माचे फळ आहे, असे म्हणतात. लोक मग काय सांगतात, क्रोध करू नका. अरे, पण क्रोध करणे हे आपल्या हातात नाहीच ना! तुम्हाला करायचा नसेल तरी पण क्रोध होऊनच जातो, नाइलाज आहे. हे तर मागील जन्माच्या कर्माचे फळ आहे.

कोण चालवितो, हे समजले ना तुम्हाला? (परीक्षेत) पास व्हाल का नापास व्हाल हे तुमच्या हातात नाही. मग ते चंदुभाऊच्या हातात आहे का? हो, थोडेफार चंदुभाऊच्या हातात आहे, फक्त 2 टक्के, आणि 98 टक्के दुसऱ्यांच्या हातात आहे. तुमच्यावर दुसऱ्या कोणाची सत्ता आहे असे तुम्हाला नाही का वाटत? असा अनुभव आला नाही? तुम्हाला वाटते की आज लवकर झोपायचे आहे पण झोपच येत नाही, असे घडते की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो, असेच घडते.

**दादाश्री :** तुमची इच्छा तर आहे, मग तुम्हाला कोण अंतराय करत आहे? दुसरी कोणती तरी शक्ती आहे, असे वाटते ना? तुम्हाला रागावण्याची इच्छा नसेल तरी पण रागावले जाते ना?

**प्रश्नकर्ता :** हो, रागावले जाते.

**दादाश्री :** मग त्या रागाचा क्रिएटर (निर्माता) कोण असेल?

**प्रश्नकर्ता :** त्याला आम्ही आत्मा म्हणतो.

**दादाश्री :** नाही. आत्मा असे करत नाही. आत्मा तर परमात्मा आहे. आणि क्रोध हा तुमचा कमकुवतपणा आहे. कर्म पाहिले आहे का तुम्ही? ही व्यक्ती कर्म करत आहे, असे पाहिले आहे का? एखाद्या माणसाला कर्म करताना तुम्ही पाहिले आहे का?

**प्रश्नकर्ता :** त्याच्या ॲक्शन (क्रिये) वरून आपल्याला समजते.

**दादाश्री :** एखादा माणूस कोणाला मारत असेल तेव्हा तुम्ही काय पाहता?

**प्रश्नकर्ता :** तो पाप करत आहे, कर्म करत आहे.

**दादाश्री :** या जगात कोणीही कर्म पाहू शकत नाही. कर्म सूक्ष्म आहे. तुम्ही जे पाहता ती कर्मचेतना आहे. कर्मचेतना निश्चेतन चेतन आहे, खरे चेतन नाही. कर्मचेतना, हे तुम्हाला समजले का?

**प्रश्नकर्ता :** कर्माची व्याख्या सांगा.

**दादाश्री :** जो आरोपित भाव आहे, तेच कर्म आहे.

तुमचे नाव काय आहे.

**प्रश्नकर्ता :** चंदुभाऊ.

**दादाश्री :** 'मी चंदुभाऊ आहे' असे तुम्ही मानता त्यामुळे तुम्ही दिवसभर कर्मच बांधत असता. रात्रीसुद्धा कर्म बांधता. कारण तुम्ही जे आहात ते तुम्ही जाणत नाही आणि जे तुम्ही नाहीत ते आहोत असे मानता. चंदुभाऊ हे तर फक्त तुमचे नाव आहे आणि तुम्ही मानता 'मी चंदुभाऊ आहे.' ही रॉंग बिलीफ (चुकीची मान्यता) आहे. मी हिचा पती आहे, ही दुसरी रॉंग बिलीफ, ह्या मुलाचा बाप आहे, ही तिसरी रॉंग बिलीफ. अशा किती तरी रॉंग बिलीफस् आहेत. परंतु जर तुम्ही आत्मा झालात, तुम्हाला त्याचे रियलाइजेशन झाले, तर मग

तुम्हाला कर्मबंधन होत नाही. 'मी चंदुभाऊ आहे' ह्या आरोपित भावाने कर्मबंधन होत असते. अशी कर्मे केल्याने त्याची फळे पुढील जन्मात येतात, ती कर्मचेतना आहे. कर्मचेतना आपल्या हातात नसते, परसत्तेत असते. आणि इथे कर्मचेतनेचे जे फळ येते ती कर्मफळचेतना आहे. तुम्ही शेयर बाजारात जाता ते कर्मचेतनेचे फळ आहे. व्यापार-धंद्यात नफा-तोटा होतो. तेसुद्धा कर्मचेतनेचे फळ आहे. पण तेव्हा तर बोलतो 'मी केले, मी कमावले, त्यामुळे आत कर्म चार्ज होत असते. 'मी चंदुभाऊ आहे' आणि 'मी हे केले' ह्या मान्यतेमुळेच नवीन कर्मे बांधली जातात.

**प्रश्नकर्ता :** कर्म देखील चांगली-वाईट असतात का?

**दादाश्री :** आता इथे या सत्संगात तुमचे पुण्य कर्म होत आहे. 24 तास तुम्हाला कर्मबंधनच होत असते, आणि आमचे हे (ज्ञान घेतलेले) महात्मा, ते एक मिनिट पण नवीन कर्म बांधत नाहीत. आणि तुम्ही तर खूप पुण्यवंत (!) आहात, तुम्ही झोपेतसुद्धा कर्म बांधता.

**प्रश्नकर्ता :** असे बरे?

**दादाश्री :** सेल्फचे रियलाइजेशन (स्वत:ची ओळख) व्हायला हवे. सेल्फचे रियलाइजेशन झाले की मग कर्मबंधन होत नाही.

स्वत:ला ओळखायचे आहे. स्वत:ला ओळखले की काम पूर्ण झाले. चोवीस तीर्थंकरांनी स्वत:ला ओळखले होते. जो दिसतो, जो ऐकतो, तो स्वत: नाही. ती सर्व परसत्ता आहे. परसत्ता आहे असे तुम्हाला वाटते का? तुम्हाला चिंता-काळजी वाटत नाही का? तर ती सर्व परसत्ता आहे, आपली स्वत:ची सत्ता नाही. स्वसत्तेत उपाधी नसते. निरंतर परमानंदच असतो!! तोच मोक्ष आहे!! स्वत:च्या आत्म्याचा अनुभव झाला तोच मोक्ष आहे. मोक्ष म्हणजे इतर काही नाही.

ही सर्व पुद्‌गलाची बाजी आहे. नरम-गरम, शाता-अशाता हे सर्व पुद्‌गलाला होत असते, आत्म्याला काहीच होत नाही. आत्मा तर तसाच्या तसाच राहतो. जो अविनाशी आहे तोच स्वत:चा आत्मा आहे.

विनाशी तत्त्वांना सोडून द्यावे. विनाशी तत्त्वांचे मालक होता कामा नये, त्याचा अहंकार नसावा. हा 'चंदुभाऊ' जे काही करत असेल ते तुम्ही फक्त पाहत राहावे की, 'तो काय करत आहे.' बस, निरंतर हेच करावे. हाच आपला धर्म आहे, ज्ञाता-द्रष्टा, आणि 'चंदुभाऊ' हे सर्व करणारा आहे. तो सामायिक करतो, प्रतिक्रमण करतो, स्वाध्याय करतो, सर्व काही करतो, त्याला तुम्ही 'पाहणारे' आहात. बस आणखी काहीच नाही. ही सामायिकच आहे. आपला आत्मा शुद्ध आहे. आत्मा कधीच अशुद्ध होत नाही. संसार असूनसुद्धा अशुद्ध झालेला नाही. आणि हे नाव, रूप ही सर्व तर भ्रांती आहे.

'चंदुभाऊ' काय करत आहे. त्याची तब्येत कशी आहे, हे सर्व 'तुम्ही' पाहावे. 'चंदुभाऊ'ला अशाता झाली तर तुम्ही त्याला सांगावे 'चंदुभाऊ, शांत व्हा, शांत व्हा, आम्ही तुमच्या सोबतच आहोत. याशिवाय दुसरे कोणतेही काम करायचे नाही.

तुम्ही स्वतःच शुद्धात्मा आहात आणि हे 'चंदुभाऊ' हे कर्माचे फळ आहे, कर्मचेतना आहे. यातून मग फळ मिळते ती कर्मफळचेतना आहे. शुद्धात्मा झाल्यानंतर काहीच करण्याची गरज नाही. शुद्धात्मा तर अक्रिय आहे. 'मी क्रिया करत आहे, हे मी केले' ही सर्व भ्रांती आहे. 'तुम्ही' तर ज्ञाता-द्रष्टा, परमानंदी आहात, आणि चंदुभाऊ 'ज्ञेय' आहे आणि हे सर्व चालविणारी 'व्यवस्थित शक्ती' आहे, देव चालवीत नाही, तुम्ही सुद्धा चालवीत नाही. आपण चालवण्याचा लगाम सोडून द्यावा आणि हे सर्व कसे चालत आहे, 'चंदुभाऊ' काय करत आहे, तेच 'पाहायचे' आहे. हा जो 'चंदुभाऊ' आहे, ते आपल्या मागील जन्माचे कर्मफळ आहे. तर आपण ते फळ पाहायचे की कोणते कर्म केले होते, काय झाले होते, किती कर्मे आहेत आणि कर्मफळ काय आहे? ती कर्मचेतना पण 'तुमची' नाही. तुम्ही तर 'पाहणारे आणि जाणणारे'च आहात.

## जीवनात ऐच्छिक काय?

**प्रश्नकर्ता :** आप्तवाणीत मी ऐच्छिक आणि अनिवार्य या विषयी

वाचले. अनिवार्य तर समजले पण ऐच्छिक कुठल्या गोष्टी आहे हे मला समजत नाही.

**दादाश्री :** ऐच्छिक काहीच नाही. ऐच्छिक तर जेव्हा 'पुरुष' होतो तेव्हा ऐच्छिक असते. जोपर्यंत 'पुरुष' झाला नाही तोपर्यंत काहीच ऐच्छिक नसते. तुम्ही 'पुरुष' झाला आहात का?

**प्रश्नकर्ता :** तुमचा हा प्रश्न मला समजला नाही.

**दादाश्री :** तुम्हाला कोण चालविते? तुमची प्रकृतीच तुम्हाला चालवीत असते. म्हणून तुम्ही पुरुष झालेले नाहीत. प्रकृती आणि पुरुष हे दोन्ही जेव्हा वेगळे होतात त्यानंतर आपली ही प्रकृती अनिवार्य आहे आणि पुरुष ऐच्छिक आहे. पुरुष झाल्यावर तुम्ही ऐच्छिकमध्ये येता, पण प्रकृतीचा भाग मात्र अनिवार्यच राहतो. भूक लागेल, तहान लागेल, थंडी वाजेल सर्व काही होईल, परंतु तुम्ही 'स्वत:' ऐच्छिकमध्ये असाल.

**प्रश्नकर्ता :** आम्ही ह्या सत्संगात आहोत ते अनिवार्य आहे की ऐच्छिक?

**दादाश्री :** तसे तर अनिवार्यच आहे, पण हा ऐच्छिक असलेला अनिवार्य आहे. जो 'पुरुष' झालेला नाही तो ऐच्छिक असलेल्या अनिवार्यात आलेला नाही. त्याच्यासाठी सर्व अनिवार्यच आहे.

हे जग काय आहे? तर अनिवार्य आहे. तुमचा जन्म झाला तेसुद्धा अनिवार्य. आयुष्यभर तुम्ही जे जे केले ते सर्व अनिवार्यपणेच केले आहे. तुम्ही लग्न केले तेसुद्धा अनिवार्यच केले.

अनिवार्यला लोक काय म्हणतात? ऐच्छिक म्हणतात. जर ऐच्छिक असेल तर कोणी मरणारच नाही. पण मरावे तर लागतेच. जे काही चांगले घडते तेही अनिवार्य आहे आणि वाईट घडते तेही अनिवार्य आहे. हो, पण त्यामागे आपला भाव काय आहे ते मात्र तुमचे ऐच्छिक आहे. करण्यामागे तुमचा हेतू काय आहे तेच तुमचे ऐच्छिक आहे. देव हेच पाहतो की तुमचा हेतू काय होता? समजले ना तुम्हाला?

सगळे जण म्हणतात नियती, म्हणजे जे घडायचे असेल ते घडेल आणि जे घडायचे नसेल ते घडणार नाही. परंतु फक्त नियती काही करू शकत नाही. सर्व संयोग गोळा झाले, सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एवीडेन्सेस् एकत्र आले तरच हे सर्व घडते. पार्लमेंटरी पद्धतीने होत असते.

तुम्ही येथे आलात तर तुम्हाला वाटते इथे आलो ते खूप चांगले झाले आणि दुसऱ्या एखाद्याला वाटते इथे आलो नसतो तर बरे झाले असते. दोन्ही पुरुषार्थ वेगवेगळे आहेत. तुमच्या आत जो हेतू आहे, भाव आहे, तोच पुरुषार्थ आहे. येथे येणे हे अनिवार्य आहे, प्रारब्ध आहे आणि प्रारब्ध तुमच्या हातात नाही, कोणा दुसऱ्याच्या हातात आहे.

तुम्ही जे करू शकता, जे करण्याची तुमची शक्ती आहे, त्याची तर तुम्हाला जाणीवच नाही, आणि जे तुम्ही करू शकत नाही, जे परसत्तेत आहे तिथे तुम्ही हस्तक्षेप करता. सर्जन शक्ती तुमच्या हातात आहे आणि विसर्जन शक्ती तुमच्या हातात नाही. तुम्ही जे सर्जन केले आहे त्याचे विसर्जन करणे तुमच्या हातात नाही. आयुष्यभर फक्त विसर्जनच होत राहिले आहे. त्यात सर्जन पण होत आहे, पण ते डोळ्यांनी दिसेल असे नाही.

## प्रारब्ध आणि पुरुषार्थाची भेदरेखा

देव काही देत नसतो. तुम्ही जे करता त्याचे फळ तुम्हाला मिळते. तुम्ही चांगले काम कराल तर चांगले फळ मिळेल आणि वाईट काम कराल तर वाईट फळ मिळेल. तुम्ही ह्या भाऊंना शिवी दिली तर तेही तुम्हाला शिवी देतील आणि तुम्ही जर कोणाला शिवी दिली नाही तर तुम्हालाही कोणी शिवी देणार नाही.

**प्रश्नकर्ता :** मी कोणाला शिवी देत नाही, तरी पण लोक मला शिव्या देतात, असे का?

**दादाश्री :** ह्या जन्माच्या वहीखात्यात हिशोब दिसत नसेल तर मागील जन्माच्या वहीखात्याचा हिशोब असेल. पण तुम्हालाच शिवी का दिली?

**प्रश्नकर्ता :** मग ती तशी परिस्थिती आहे, असे समजावे का?

**दादाश्री :** हो परिस्थितीच. आम्ही त्याला सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एवीडन्सेस् म्हणतो. परिस्थितीच तशी आली तर त्यात वाईट वाटायचे काही कारणच नाही. खरे काय आहे? तर कोणी कोणाला शिवी देतच नाही. परिस्थितीच शिवी देत असते. ओन्ली सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्सच शिवी देत असते. खिसे कोणी कापतच नाही, परिस्थितीच खिसे कापत असते. पण माणसाला परिस्थितीची जाणीव राहणार नाही. मी खरी गोष्ट सांगू का?

जर एखाद्याने तुमचा खिसा कापला आणि दोनशे रुपये पळवले. तर तुम्हाला आणि लोकांनाही असेच वाटेल की ह्या वाईट माणसाने माझा खिसा कापला, तो गुन्हेगारच आहे. पण ही गोष्ट खरी नाही. खरी गोष्ट ही आहे की तुमचे 200 रुपये जाण्यासाठी तयार झाले होते, कारण ते पैसे खोटे होते. आणि त्यासाठी तो माणूस फक्त निमित्त झाला. तो तर निमित्त आहे, तेव्हा तुम्ही त्याला आशीर्वाद द्या की तू मला ह्या कर्मातून मुक्त केलेस. कोणी शिवी दिली तर तोही निमित्तच आहे. तो तुम्हाला कर्मातून मुक्त करत आहे. तुम्ही त्याला आशीर्वाद दिले पाहिजेत. कुणी पन्नास शिव्या दिल्या पण त्या एक्कावन होणार नाहीत. पन्नास शिव्या देऊन झाल्यावर जर तुम्ही त्याला म्हणाल की 'बाबा रे, मला आणखी शिव्या दे', तर तो देणार नाही. माझे म्हणणे समजले का तुम्हाला? ह्या एका वाक्याने सर्व कोडी सुटतील. कुणी शिव्या दिल्या, दगड मारला तरी तो निमित्त आहे आणि जबाबदारी तुमची आहे. कारण पूर्वी तुम्ही जे केले होते त्याचे आज फळ मिळाले.

पूर्वी जी भावना केली होती, आज हे त्याचे फळ आले आहे. तर फळात तुम्ही काय करू शकता? परिणामात तुम्ही काही करू शकता का? तुम्ही लग्न केले त्यावेळी तुम्ही काय टेन्डर भरले होते का की मला बायको पाहिजे? नाही. ती भावना तर पूर्वीच केली गेली होती. (आधी) सगळी तयारी होत असते, नंतर परिणाम येतो. बायको मिळते तो परिणाम आहे. नंतर तुम्ही म्हणता मला ही बायको आवडत

नाही. अहो, पण हा तर तुमचाच परिणाम आहे. मग तुम्ही आवडत नाही असे कसे बोलू शकता? परीक्षेच्या परिणामात तुम्ही नापास झालात, मग त्यात आवड-नावड करण्याची काय गरज आहे?

**प्रश्नकर्ता :** तर मग पुरुषार्थ म्हणजे नक्की काय?

**दादाश्री :** खरा पुरुषार्थ तर पुरुष झाल्यानंतरच होत असतो. प्रकृती रिलेटिव्ह आहे आणि पुरुष रियल आहे. जेव्हा पुरुष आणि प्रकृतीची डिमार्केशन लाइन-भेदरेषा आखली जाते की, ही प्रकृती आहे आणि हा पुरुष आहे, त्यानंतर खऱ्या पुरुषार्थाची सुरुवात होते. मात्र तोपर्यंत भ्रांत पुरुषार्थ असतो. भ्रांत पुरुषार्थ, म्हणजे तुम्ही हजार रुपयांचे दान देता आणि अहंकार करता की मी हजार रुपयांचे दान दिले, मग हाच पुरुषार्थ आहे. 'मी दिले' असे म्हणता याला भ्रांत पुरुषार्थ म्हटला जातो. तुम्ही कोणाला शिवी देता आणि नंतर पश्चाताप करता की 'असे होता कामा नये', तर तोसुद्धा भ्रांत पुरुषार्थ म्हणायचा. ज्या बाबतीत तुम्हाला ठीक वाटते की असे करणे शुभ आहे आणि तेव्हा जर तुम्ही म्हणालात की 'हे मी केले' तर तो भ्रांत पुरुषार्थ आहे. आणि जेव्हा अशुभ असते तेव्हा मौन राहता आणि पश्चाताप करता तो देखील पुरुषार्थ आहे. 'मी केले' असे जर सहज रूपाने बोललात तर तुम्ही अहंकार करत नाहीत पण पुढच्या प्रगतीसाठी पुरुषार्थ करत आहात. पण इगोइजम (अहंकार) मात्र नॉर्मल असावा. अबव नॉर्मल इगोइजम इज पॉइजन ॲन्ड बीलो नॉर्मल इगोइजम इज आल्सो पोइजन, त्याला पुरुषार्थ म्हणत नाहीत.

आम्हाला मोठमोठे साहित्यकार विचारतात की लोक जेव्हा, 'दादा भगवानांचा असीम जयजयकार असो' असे बोलतात तेव्हा तुम्हाला आत काहीच होत नाही का? तेव्हा मी त्यांना सांगतो मला त्याची काय गरज आहे? माझ्या आत एवढे सारे सुख आहे मग मला याची गरजच काय? हे तर तुमच्या फायद्यासाठी बोलायचे आहे. आम्ही तर संपूर्ण जगाचे शिष्य आहोत आणि लघुत्तम आहोत. बाय रिलेटिव्ह व्ह्यू पॉइंट मी लघुत्तम आहे आणि बाय रियल व्ह्यू पॉइंट मी गुरुत्तम आहे! बाहेर

सगळे जण रिलेटिव्हमध्ये गुरुत्तम व्हायला गेले. पण रिलेटिव्हमध्ये गुरुत्तम व्हायचे नसते. रिलेटिव्हमध्ये तर लघुत्तम व्हायचे असते. रिलेटिव्हमध्ये लघुत्तम झाले की रियलमध्ये ऑटोमेटिक गुरुत्तम पद प्राप्त होते.

भगवंतांची भक्ती करतो ते देखील प्रारब्ध आहे. प्रत्येक गोष्ट प्रारब्धच आहे, आणि पुरुषार्थाशिवाय प्रारब्ध असूच शकत नाही. पुरुषार्थ बीज स्वरूप आहे आणि त्याचे झाड म्हणजेच प्रारब्ध. पैसे मिळतात तेसुद्धा प्रारब्ध आहे, पण पैसे दान देण्याची भावना आहे तो पुरुषार्थ आहे. तुम्ही भगवंताची भक्ती करायला बसले असाल आणि बाहेर कोणी तुम्हाला बोलवायला आला तर तेव्हा तुमच्या मनात भक्ती लवकर आटपायचा विचार येतो, तर लवकर आटपायचा विचार हा पुरुषार्थ आहे आणि भक्ती केली ते प्रारब्ध आहे. मन, बुद्धी, शरीर हे सर्व एकत्र येऊन जी कार्ये होतात ते प्रारब्ध आहे. प्रारब्ध आणि पुरुषार्थ याची जी भेदरेषा आहे ती तुम्हाला समजली ना?

उशीरा उठला ते प्रारब्ध आहे पण भगवंतांची भक्ती करण्याचा भाव केला तो पुरुषार्थ आहे. कोणी लवकर उठतो ते पण प्रारब्ध आहे. तुमच्यावर कोणी उपकार केले आणि त्याला जेव्हा अडचण असेल तेव्हा तुम्ही त्याला मदत करता ते प्रारब्ध आहे. परंतु तेव्हा जर तुमच्या मनात असे आले की 'त्याला मदत करण्याची गरज नाही', तर हा तुम्ही चुकीचा पुरुषार्थ केला असे म्हटले जाईल. तुमचे मनोभाव बिघडवू नका. भाव हा तर पुरुषार्थ आहे. कोणी तुम्हाला पैसे दिले तर तो पैसे देणाऱ्याचेही प्रारब्ध आहे आणि तुमचेही प्रारब्धच आहे. परंतु जर तुमच्या मनात आले की 'मी पैसे परत केले नाही तर तो काय करणार आहे', तर तो चुकीचा पुरुषार्थ म्हणायचा. आणि जर त्याला पैसे परत करण्याचा भाव असेल तर तोसुद्धा पुरुषार्थ आहे, तो सरळ पुरुषार्थ आहे.

चोरी केली ते पण प्रारब्ध आहे, परंतु चोरी केल्यानंतर पश्चाताप झाला तर तो पुरुषार्थ आहे. चोरी केल्यानंतर त्याला आनंद वाटतो तेही प्रारब्ध आहे, आणि जर त्याला वाटले की 'असे कधीच करू नये' तर तो पुरुषार्थ आहे. तो सतत चोरी करतो पण प्रत्येक वेळी बोलतो

'काहीही झाले, मेलो तरी कधी चोरी करू नये' तर तो त्याचा पुरुषार्थ आहे.

**प्रश्नकर्ता :** दादाजी, ह्या गृहस्थांनी गरीबांच्या घरी जाऊन खूप सेवा केली आहे, मोफत औषधे दिली आहेत, आणि ते स्वत:ही आध्यात्मिक विचारांचे आहेत, तरी पण त्यांना एक असा शारीरिक आजार झाला आहे आणि त्यामुळे त्यांना खूप त्रास भोगावा लागतो. तर हे असे का घडते? हे मला समजत नाही.

**दादाश्री :** तुम्ही जे पाहिले की यांनी खूप चांगली चांगली कामे केली आहेत, तर त्याचे फळ त्यांना पुढील जन्मात मिळेल. आणि ह्या जन्मात मागील जन्माचे फळ मिळाले आहे.

**प्रश्नकर्ता :** पुढील जन्माचे नाही, पुढील जन्मात कशाला? आजच का नाही? आत्ता भूक लागली तर आताच खायला पाहिजे. आता खाल्ले तरच त्याला संतोष वाटेल ना?

**दादाश्री :** ही जी दु:खे येतात. ती मागील जन्मांच्या वाईट कर्मांचे फळ आहे. आज चांगली कामे करतो तेसुद्धा मागील जन्मांच्या चांगल्या कर्माचे फळ आहे. पण यातूनच पुढील जन्मासाठी नवीन कर्म बांधत असतो. कर्म म्हणजे काय? तर समजा एक मुलगा नेहमी हॉटेलमध्ये खात आहे. तुम्ही त्याला म्हणता हॉटेलमध्ये खाऊ नकोस, आणि त्या मुलालाही समजत असते की हे चुकीचे होत आहे. तरी पण तो रोजच हॉटेलात जाऊन खात असतो. याचे काय कारण? तर हे त्याच्या मागील जन्माचे फळ आले आहे. आणि आत्ता खात आहे त्याचे फळ त्याला आत्ताच मिळेल. त्याची तब्येत बिघडेल आणि इथेच त्याला फळ मिळेल. पण जे आंतरिक कर्म आहे, जे भावकर्म आहे की 'हॉटेलाचे खाऊ नये,' या भावकर्माचे फळ त्याला पुढील जन्मात मिळेल. तर अशी दोन प्रकारची कर्मे असतात. जी स्थूल कर्मे आहेत त्याचे फळ इथल्या इथेच मिळते आणि जी सूक्ष्म कर्मे आहेत त्याचे फळ पुढच्या जन्मी मिळते.

**प्रश्नकर्ता :** मी असे मानत नाही.

**दादाश्री :** हो, तुम्ही मानले नाही तरीही नियमात तर राहावेच लागेल ना? आणि मानाल तरीही नियमात राहावे लागेल. यात तर तुमचे काहीच चालणार नाही. कोणाचेही चालणार नाही. द वर्ल्ड इज एवर रेग्यूलर (जग नेहमीच नियमित असते)! या जगात कधीच चूकभूल होत नसते. एवर रेग्युलरच आहे आणि ते तुमच्याच कर्माचे फळ देत असते. रेग्युलॅरिटीमध्ये त्याला काहीच अडचण येत नाही. ते नेहमी न्यायस्वरूपच असते. निसर्ग न्यायपूर्णच आहे. निसर्ग कधी न्यायाबाहेर जातच नाही.

## प्रत्येक इफेक्टमध्ये कॉजेस कोणाचे?

**दादाश्री :** या शरीरात किती वर्षे राहायचे आहे?

**प्रश्नकर्ता :** जोपर्यंत आपल्या एक्सपेक्टेशनस् (इच्छा, अपेक्षा) आहेत, फुलफिलमेंटस् आहेत त्या पूर्ण होत नाहीत, तोपर्यंत तर राहूच ना?

**दादाश्री :** तो हिशोब आहे, तो तर पूर्ण होऊनच जातो. पण त्यातून नवीन काय होत असते?

**प्रश्नकर्ता :** एका पाठोपाठ एक नवीन गोष्टी तर घडतच राहतात.

**दादाश्री :** मग ती नवीन गोष्ट चांगली हवी की वाईट?

**प्रश्नकर्ता :** चांगलीच हवी.

**दादाश्री :** मागच्या जन्मी तुम्ही तुम्हाला आवडणार नाही अशा इच्छा-अपेक्षा केल्या होत्या का?

**प्रश्नकर्ता :** माहीत नाही.

**दादाश्री :** तुम्हाला आवडणार नाही असे कधी घडते का?

**प्रश्नकर्ता :** हो, घडते ना!

**दादाश्री :** मग तुम्हाला आवडत नाही असे का घडत असेल? कोणी जबरदस्ती करतो का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** तर मग त्या कोणाच्या आहेत? तुमच्याच आहेत की इतर कोणाच्या?

**प्रश्नकर्ता :** अपेक्षा तर स्वत:च्याच असतात.

**दादाश्री :** हो, पण वाईट गोष्टी आवडत नाहीत ना? जे काही होत आहे त्या सर्व आपल्याच अपेक्षा आहेत, तर मग वाईट का आवडत नाही?

**प्रश्नकर्ता :** आपल्या अपेक्षा चांगल्याच असाव्यात असे आपण इच्छितो, पण तसे होत नाही ना?

**दादाश्री :** का? त्यात तुम्ही 'स्वत:' नाही का?

**प्रश्नकर्ता :** आहे.

**दादाश्री :** मग तुम्ही त्या बदलून का टाकत नाही? तुम्ही जिथे सही करता ती समजूनच करता. मग तुम्ही सही केली आहे त्यानुसारच अपेक्षा येतात. तर आता त्यात चुका कशाला काढता? चूक आहे असे का वाटते तुम्हाला?

**प्रश्नकर्ता :** नाही, चूक वाटत नाही. पण काही इच्छा-अपेक्षा अशा असतात की त्या आपल्याकडून पूर्ण होऊ शकत नाहीत.

**दादाश्री :** म्हणजे तुमच्या ज्या अपेक्षा आहेत त्या पूर्ण होत नाहीत, असे?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** अपेक्षा दोन प्रकारच्या असतात. मागच्या (जन्माच्या) ज्या अपेक्षा आहेत त्या आता पूर्ण होतील, आणि ज्या नवीन अपेक्षा आहेत त्या आता पूर्ण होणार नाहीत. त्या पुढील जन्मात पूर्ण होतील. जुन्या अपेक्षा ह्या जन्मात पूर्ण होतात. जुन्या अपेक्षा इफेक्ट (परिणामा)च्या रूपात आहेत, ज्याचे कॉजेस (कारणे) मागील जन्मात केले गेले होते. ह्या जन्मात त्याचा परिणाम आला आहे, परिणामात काहीच बदल होऊ शकत नाही. सध्या आत कॉजेस तयार होत आहेत आणि त्याचा इफेक्ट (परिणाम) पुढील जन्मात येईल. म्हणून कॉजेस चांगले करा.

मित्राचे त्याच्या बायकोशी झालेले भांडण पाहून तुम्ही मनात विचार करता की 'लग्न करायला नकोच.' तर मग पुढील जन्मात तुमचे लग्न होणार नाही. तेव्हा अशी कॉजेस करू नका. तुम्ही जे पाहिले त्यावरून कॉजेस करू नका. जे चांगले आहे त्याची कॉजेस करा.

चांगली कॉजेस कशी असावीत याचा शोध घ्या. मला ही भौतिक सुखे हवी आहेत, तर त्यासाठी तुम्ही कशी कॉजेस करावीत हे आम्ही तुम्हाला सांगू. त्यासाठी तुम्ही 'मला मन-वचन-कायेने कोणत्याही जीवाला मारायचे नाही, दु:ख द्यायचे नाही, अशी कॉजेस करा. मग तुम्हाला सुखच मिळेल. अर्थात अशी कॉजेस असावीत.

तुमच्या जन्मापासून ते मरेपर्यंत हा सर्व इफेक्ट (परिणाम)च आहे. त्यातूनच आता (नवीन) कॉजेस तयार होत आहेत.

**प्रश्नकर्ता :** पुनर्जन्माचा कधी अंत असतो का?

**दादाश्री :** हो, त्याचा अंत तर असतो. कॉजेस बंद झाल्यावर अंत येतो. जोपर्यंत कॉजेस चालू असतात तोपर्यंत अंत येत नाही.

**प्रश्नकर्ता :** कॉजेस बंद झाले पाहिजेत असे तुम्ही म्हणालात, तर चांगले आणि वाईट दोन्ही प्रकारचे कॉजेस बंद झाले पाहिजेत का?

**दादाश्री :** हो, दोन्ही बंद व्हायला हवेत. अहंकारामुळे कॉजेस होतात आणि इफेक्टमुळे संसार चालतो. अंहकार गेला की कॉजेस बंद होतील आणि त्यामुळे मग संसार पण बंद होईल. त्यानंतर पर्मनन्ट सनातन सुख लाभते. आता जे सुख मिळाले आहे ते तर कल्पित सुख आहे, आरोपित सुख आहे. आणि दु:ख पण आरोपितच आहे. खरे सुख पण नाही आणि खरे दु:ख पण नाही.

## सूक्ष्म शरीर म्हणजे काय?

**प्रश्नकर्ता :** पुनर्जन्म सूक्ष्म शरीराचा होतो का? कारण स्थूल शरीर तर इथेच पडून राहतो ना?

**दादाश्री :** हो, जी फिजीकल बॉडी (शरीर) आहे ती तर इथेच राहते आणि सूक्ष्म शरीर सोबत जाते. जोपर्यंत कमकुवतपणा जात नाही, राग-द्वेष, नष्ट होत नाहीत, तोपर्यंत पुनर्जन्म होतच राहतो.

**प्रश्नकर्ता :** मन, बुद्धी, चित्त, अहंकार, यालाच सूक्ष्म शरीर म्हणतात का?

**दादाश्री :** नाही. ते सूक्ष्म शरीर नाही. सूक्ष्म शरीर तर इलेक्ट्रिकल बॉडीला (तेजस शरीराला) म्हणतात. मन, बुद्धी, चित्त, अहंकार हे तर अंत:करण आहे. इलेक्ट्रिकल बॉडी प्रत्येक शरीरात असते, झाडात, प्राण्यात सगळ्यांच्यात असते. आपण जेवण जेवतो, त्याचे पचन होते ते सर्व इलेक्ट्रिकल बॉडीमुळे होत असते. मृत्यूवेळी आत्म्याबरोबर कॉजल बॉडी आणि इलेक्ट्रिकल बॉडी (कारण शरीर आणि तेजस शरीर) जात असते. पुढील जन्मात कॉजल बॉडीच इफेक्टीव बॉडी बनून जाते.

**प्रश्नकर्ता :** कॉजल बॉडी याचे कारण आत्माच आहे ना?

**दादाश्री :** नाही. कॉजल बॉडीचे कारण अज्ञानता आहे.

**प्रश्नकर्ता :** मग ही इलेक्ट्रिकल बॉडी म्हणजे नेमके काय, हे जरा पुन्हा सांगा ना.

**दादाश्री :** आपण जेवण जेवतो ते इलेक्ट्रिकल बॉडीमुळे पचत असते. मग त्याचे रक्त बनते, लघवी बनते, असे विभाजन त्यामुळेच होत असते. केस होतात, नखे बनतात हे सर्व इलेक्ट्रिकल बॉडीमुळेच होत असते. यात देव काहीच करत नाही.

ही इलेक्ट्रिकल बॉडी म्हणजे, पाठीमागे जो मेरुदंड (पाठीचा कणा) आहे त्यातून तीन नाड्या निघतात. इडा, पिंगला आणि सुषुम्ना. यातून इलेक्ट्रिसिटी पूर्ण शरीरात जाते. हा रागही त्यामुळे होत असतो. जीवमात्रात ही इलेक्ट्रिक बॉडी कॉमन (सामान्य) असते. इलेक्ट्रिक बॉडी कधीपर्यंत राहते? तर जोपर्यंत मोक्ष होत नाही तोपर्यंत राहते. इलेक्ट्रिक बॉडीमुळे डोळ्यांनी दिसू शकते. बॉडीचा मॅग्नेटीक इफेक्ट

(चुंबकीय परिणाम) तोसुद्धा इलेक्ट्रिकल बॉडीमुळेच आहे. तुमची इच्छा नसेल तरी पण आकर्षण होऊन जाते ना? जीवनात कधी असा अनुभव झाला आहे का? एकदा-दोनदा तरी झाला आहे? हा मॅग्नेटीक इफेक्ट आहे आणि आरोप करतो की, 'मला असे (आकर्षण) होत आहे.' 'अरे, पण तुझी इच्छा तर नव्हती, मग तू कशाला डोक्यावर घेतोस?'

शरीराचा जो नूर असतो, तेज असते ते चार प्रकारे प्राप्त होते. 1) कोणी धनवान असेल आणि सुख-चैनीत राहत असेल तर त्याचे जे तेज येते, तो लक्ष्मीचा नूर. 2) कोणी धर्म करत असेल तर त्याच्या आत्म्याचा प्रभाव पडतो, तो धर्माचा नूर. 3) कोणी खूप अभ्यास करतो, रिलेटिव्ह विद्या प्राप्त करतो, तर त्याचे तेज येते, ते पांडित्याचा नूर आणि 4) ब्रह्मचर्याचे तेज येते, तो ब्रह्मचर्याचा नूर.

**प्रश्नकर्ता :** ह्या इलेक्ट्रिकल बॉडीचे संचालन 'व्यवस्थित शक्ती' करते का?

**दादाश्री :** इलेक्ट्रिकल बॉडीचे संचालन आणि व्यवस्थित शक्ती याचे काहीच देणेघेणे नाही. इलेक्ट्रिकल बॉडी स्वत:च्या स्वभावातच असते. पूर्णपणे स्वतंत्र आहे. कोणाच्याही ताब्यात नसते.

## इन्डेट केले कोणी? जाणले कोणी?

**दादाश्री :** जेवण जेवले जाते याचे इन्डेट (मागणी, इच्छा) कोण भरतो? ही इच्छा कोणाची आहे? तुम्ही स्वत: आहात का त्याच्यात?

**प्रश्नकर्ता :** ते तर मला माहीत नाही?

**दादाश्री :** ही इच्छा शरीर करते. या शरीराचे जे परमाणू आहेत ते मागणी करतात. यात मनाची गरजच नाही. मनाची गरज कधी पडते? मनाचा एविडन्स केव्हा होत असतो? तर जेव्हा चवीसाठी आंबट-गोड हवे असते तेव्हा ते मनाला हवे असते आणि बिनचवीचे असते ते शरीराला हवे असते. अर्थात चविष्टची इच्छा मनाची आहे आणि बिन चवीची इच्छा शरीराची आहे. यात आत्म्याची इच्छा नसते.

पाणी पितो ते कोणाला हवे असते? तीसुद्धा शरीराची इच्छा आहे. आणि इतर सर्व पेय पितो, कोल्ड ड्रिंक्स् वगैरे ती कोणाची इच्छा आहे? तर ती मन आणि शरीर या दोघांची इच्छा आहे.

इच्छा कोणाची आहे हे जर कळले तर मग त्याचा *उपरी* कोण आहे तेही कळते. आणि या सर्वांना जो जाणतो तो स्वत:च परमात्मा आहे. सगळे जण म्हणतात, 'आम्ही खाल्ले.' पण ही गोष्ट चुकीची आहे.

झोपेची इच्छा कोणाची आहे?

**प्रश्नकर्ता :** शरीराची आहे.

**दादाश्री :** हो, शरीराची आहे. पण पूर्णत: शरीराची नाही. जितका वेळ खरी झोप लागते, गाढ झोप लागते तेवढीच इच्छा शरीराची असते. त्यापेक्षा जास्त झोप ही मनाची (इच्छा) असते. त्याला ऐषोआराम म्हणतात. शरीराला प्युअर (खरी) झोप पाहिजे, ऐषोआराम नाही. ऐषोआराम मनाला हवे असते.

ऐकतो कोण? मन ऐकत असते का? ही कोणाची इच्छा आहे?

**प्रश्नकर्ता :** तसे तर म्हणतात कान ऐकत असतात?

**दादाश्री :** नाही, पण इच्छा कोणाची असते, ऐकण्याची इच्छा कोणाची असते?

**प्रश्नकर्ता :** मनाची.

**दादाश्री :** नाही, ती अहंकाराची इच्छा असते. जेवढे फोन येतात ते सर्व अहंकारच घेतो. मनाला घेऊच देत नाही. अहंकार असा शेठ आहे की, कोणालाच हात लावू देत नाही. 'तू गप्प बस, मीच फोन उचलेन', असेच करत असतो.

**प्रश्नकर्ता :** तर मग डोळ्यांची (पाहण्याची) इच्छा कोण करतो?

**दादाश्री :** डोळ्यांच्या इच्छेत तर मनाची, अहंकाराची आणि

डोळ्यांची वेगवेगळ्या वेळेस वेगवेगळी इच्छा असते. पण कानाची (ऐकण्याची) इच्छा ही जास्त करून अहंकाराची सवय आहे.

आत असे सर्व सायन्स (विज्ञान) चालत आहे, त्याला आपण पाहावे आणि जाणावे. आतील प्रयोगशाळेत जे प्रयोग होत असतात त्या सर्व प्रयोगांना ज्याने जाणून घेतले, तो परमात्माच झाला. संपूर्ण जगाचे प्रयोग नाही, पण ह्या एवढ्याच प्रयोगात संपूर्ण जगाचे सर्व प्रयोग येऊन जातात. कारण याच्यात जसा प्रयोग आहे तसाच प्रयोग सगळ्या जीवांमध्येही असतो. म्हणून फक्त स्वत:चे जाणले की सर्वांचे जाणले, आणि जो सर्वांचे जाणतो तोच परमात्मा आहे.

परमात्मा कधी जेवतही नाही आणि झोपतही नाही. हे सर्व (पंचेंद्रियांचे) विषय आहेत ना, त्यातील कोणत्याच विषयाचा भोक्ता परमात्मा नाही. विषयांचा भोक्ता जर परमात्मा झाला तर परमात्म्याला मरावे लागेल. मरायला कोण लावतो? तर हे विषयच मरायला लावतात? विषय नसतील तर मरावेही लागणार नाही.

या शरीरात सारे विज्ञानच आहे. पण लोक शरीरात शोधत नाहीत, आणि बाहेर, चंद्रावर बघायला जातात. मग तिथे चंद्रावरच सोसायटी बनवून राहतील आणि तिथे लग्न पण करतील. अशी माणसे आहेत ही!

खरे तर, मनुष्य खातच नाही. तुमच्या ताटात जेवण कुठून येते? हॉटेलमधून येते का? हे जेवण कुठून आले त्याचा शोध घ्यायला नको का? तेव्हा तुम्ही म्हणता बायकोने वाढले. पण मग बायकोने कुठून आणले? मग बायको म्हणेल 'मी तर व्यापाऱ्याकडून आणले.' व्यापारी म्हणेल 'मी शेतकऱ्याकडून आणले.' मग त्या शेतकऱ्याला विचारले 'तू कुठून आणलेस?' तर तो म्हणेल, 'शेतात बी पेरले ते उगवले.' म्हणजे याचा शेवट सापडेल असे नाहीच. मागणी करणारा मागणी करतो सप्लाय (पुरवठा) करणारा सप्लाय करतो. तुम्ही सप्लायर नाहीत. तुम्ही मात्र पाहणारे आहात की काय खाल्ले आणि काय खाल्ले नाही. हे जाणणारे तुम्ही आहात. आणि म्हणता 'मी खाल्ले.' अहो, तुम्ही हे सर्व कुठून

आणले? तांदूळ कुठून आणले, भाजी कुठून आणली? तुम्ही भाजी वाढवली का? तुमचे बाग नाही, तुमचे शेत नाही, मग कुठून आणली? तर म्हणाल 'विकत आणली.' आज तुम्हाला बटाटे खायची इच्छा नव्हती तरी पण का खावे लागले? तुम्हाला आज दुसरी एखादी भाजी खायची इच्छा असते पण नेमकी बटाट्याची भाजीच ताटात येते, असे घडते ना? तुमच्या इच्छेनुसारच जेवण येते का? नाही! आत जेवढे हवे असेल तेवढेच आत जाते, त्याहून अधिक जात नाही. आत जेवढे हवे असेल. जेवढी इन्डेन्ट असेल, मागणी असेल, त्याहून अधिक एक परमाणूसुद्धा जात नाही. तो जास्त खातो आणि नंतर म्हणतो 'आज तर मी जरा जास्तच खाल्ले.' तेसुद्धा तो खात नाही. आत जेवढी मागणी असेल तेवढेच खातो. जेवण जेवण्याची शक्ती जर स्वत:ची झाली तर कधी मरावेच लागणार नाही! पण तो तर मरतोच ना?!

आतील परमाणू मागणी करतात आणि बाहेरून सर्व मिळत जाते. या बाळाला तर तुम्ही दूध द्यायचे आणि खायला द्यायचे, बाकी सर्व नैसर्गिकरित्या मिळत राहील. आणि त्याचप्रमाणे तुमचे सर्वही चालत असते पण तुम्ही अहंकार करता की 'हे मी केले.' तुम्हाला आंबा खायची इच्छा झाली तर बाहेरून तुम्हाला आंबा मिळेल. ज्या गावाचा आंबा हवा असेल त्याच गावाचा मिळेल.

पण लोक काय करतात की आतील इच्छा बंद करून टाकतात, त्यामुळे सर्व बिघडते. आत जे सायन्स चालत आहे त्याला तुम्ही पाहत राहा. याचा कोणी कर्ता नाही. हे सायंटिफिक आहे, सिद्धांत आहे. आणि सिद्धांत सिद्धांतच राहतो.

तुम्हाला माझे म्हणणे समजते ना? त्याचे असे आहे की हिन्दी भाषेवर आमचा काबू नाही. फक्त समजावण्यासाठी आम्ही हिन्दी बोलत आहोत. यात 5 टक्के हिन्दी आहे आणि 95 टक्के दुसरे सगळे मिक्सचर आहे. पण जेव्हा चहा बनणार, तेव्हा तो चहा छानच बनणार!

**- जय सच्चिदानंद**

## संपर्क सूत्र

### दादा भगवान परिवार

**अडालज** : **त्रिमंदिर**, सीमंधर सिटी, अहमदाबाद-कलोल हाईवे,
पोस्ट : अडालज, जि.-गांधीनगर, गुजरात - 382421
**फोन** : 9328661166, 9328661177
E-mail : info@dadabhagwan.org

**मुंबई** : **त्रिमंदिर,** ऋषिवन, काजुपाडा, बोरिवली (E)
फोन : 9323528901

| | | | |
|---|---|---|---|
| **दिल्ली** | : 9810098564 | **बेंगलूर** | : 9590979099 |
| **कोलकता** | : 9830080820 | **हैदराबाद** | : 9885058771 |
| **चेन्नई** | : 7200740000 | **पूणे** | : 7218473468 |
| **जयपुर** | : 8890357990 | **जलंधर** | : 9814063043 |
| **भोपाल** | : 6354602399 | **चंडीगढ** | : 9780732237 |
| **इन्दौर** | : 6354602400 | **कानपुर** | : 9452525981 |
| **रायपुर** | : 9329644433 | **सांगली** | : 9423870798 |
| **पटना** | : 7352723132 | **भुवनेश्वर** | : 8763073111 |
| **अमरावती** | : 9422915064 | **वाराणसी** | : 9795228541 |

**U.S.A.** : **DBVI Tel. :** +1 877-505-DADA (3232),
**Email :** info@us.dadabhagwan.org

**U.K.** : +44 330-111-DADA (3232)

**Kenya** : +254 722 722 063

**UAE** : +971 557316937

**Dubai** : +971 501364530

**Australia** : +61 421127947

**New Zealand** : +64 21 0376434

**Singapore** : +65 81129229

**www.dadabhagwan.org**



## कर्माचा सिद्धांत

'मी केले' असे म्हटले की कर्मबंधन होते. 'हे मी केले' यात इगोइजम (अहंकार) आहे आणि इगोइजममुळे कर्मबंधन होत असते. जिथे इगोइजमच नाही, 'मी केले' असे नाहीच तिथे कर्मबंधन होत नाही.

– दादाश्री

dadabhagwan.org

ISBN 978-93-91375-09-6
9 789391 375096
Printed in India
Price ₹ 20